॥ श्रीज्ञानेश्वर माउली समर्थ ॥

श्रीगुलाबरावमहाराजकृत समग्र ग्रंथावलि

# संप्रदाय-सुरतरु

भाग २ रा



संपादक-ज्ञानेश्वरकन्या बा. नारायण पंकाजी पंडित.
श्रीज्ञानेश्वरसंस्थान, नागपूर

प्रकाशक-शंकर जयराम सोमवंशी, ज्ञानेश्वरीभक्त B. A.
मु. नाशिक

व्यवस्थापक-ज्ञानेश्वर ग्रंथ भांडार, १२८ रास्ता, पुणें.

मुद्रक-वामन आठ जोशी, ज्ञानविलास प्रेस, पुणें

चै. शु. १ शके १८६०

किंमत ३॥ रुपये

आ. २ री ] [ सन १९३८

## अलौकिक संतविभूति श्रीगुलाबरावमहाराज ( वऱ्हाड )



नमः श्रीसच्चिदानंदमाधुर्यघनमूर्तये । श्रीपांडुरंगनाथाय ज्ञानेशमधुराय च ॥
[illegible] यथा ॥

श्रीनारायण प्रसन्न

# प्रस्तावना

" एकः शब्दः सम्यग्ज्ञातः स्वर्गे लोके कामधुक् भवति ॥"

श्रीमत्साधुवर्य गुलाबरावमहाराज या अलौकिक विभूतीनें आधुनिक चिकित्सक व संशयात्म्या जनांस, आपल्या सर्वश्रेष्ठ विभूतिमत्त्वानें चकित करून सोडलें यांत शंका नाहीं. चातुर्वर्ण्याच्या आधुनिक समजाप्रमाणें, वेदानधिकारी अशा वर्णांत जन्म, बालांधता, शिक्षणाचा म्हणजे प्राथमिक शिक्षणाचाही अभाव, खेड्यांतील राहणी या सर्व बाबींचा, श्रीगुलाबराव-महाराजांच्या ह्यातींतील त्यांच्या सर्वगामी बुद्धिमत्तेच्या व सर्वशास्त्रप्रवीण-तेच्या अनेक घडलेल्या गोष्टींचा आणि त्यांनीं गद्यपद्यात्मक अशा रचून व उपदेशून तयार केलेल्या अनेक सद्ग्रंथांचा व त्यांतील सर्वशास्त्रावगाही विषयविवेचनपद्धतीचा विचार केल्यावरच त्यांचें अलौकिक विभूतिमत्त्व प्रत्ययास येतें व बुद्धीस पटतें: आणि मग सहजां, अवतरणांत उद्धृत केलेलें वाक्य श्रद्धापूर्वक उच्चारिलें वा लिहिलें जातें.

पराविद्या व अपराविद्या असा आपल्याकडे भेद केला असून परा विद्या म्हणजे ब्रह्मविद्या ही सर्व विद्यांहून, सर्व लौकिक विद्यांहून श्रेष्ठ आहे, इतकेंच नव्हे तर सर्व अपरा विद्यांचें ज्ञान एका परा विद्येच्या ज्ञानांत समाविष्ट होतें असेंही मानिलें आहे. याचा प्रत्यक्ष अनुभव म्हणजेच श्रीमत् साधुवर्य गुलाबरावमहाराज हे होत, यांत शंका नाहीं. श्रीमन्महाराजांनी एका परा-विद्येचा आश्रय केला, एका शब्दाचा—ब्रह्मशब्दाचा—अभ्यास केला. त्याच्यांत तन्मयता संपादिली; आणि त्यांना तो शब्द स्वर्ग, मोक्ष आणि लोक यां-विषयीं कामधुक् सर्व वासनांच्या बाबतींत, सर्व वासनांच्या कामाचा दोहणारा—पुरविणारा झाला असें स्पष्ट दिसून येत आहे. पर्यायस्वरूप एक

शब्दाच्या सम्यक्ज्ञानानें भूलोकांतील सर्व विद्या व वासना, स्वर्गलोकांतील सर्व ज्ञानें व आकांक्षा आणि शेवटीं तद्रूपता कां बरें प्राप्त होऊं नयेत ! श्रीमान् महाराजांची स्थिति अशीच दिसून येते. त्यांनीं आपल्या भगवद्भक्तिबलानें सर्व ऐहिक विद्या आत्मसात् केलेल्या दिसतात. किंवा श्रीप्रभु रामचंद्रापुढें ज्याप्रमाणें ऋषिप्रोक्त मंत्रबलानें सरहस्य जृंभकास्त्रें हात जोडून प्रगट झालीं व त्यांना त्या अस्त्रांच्या आरोहावरोहाचें ज्ञान स्वयं प्रगटलें, त्याचप्रमाणें श्रीमहाराजांपुढें त्यांच्या श्रीतातांच्या कृपाप्रसादानें व भगवदेकशरणतेनें ह्या सर्व विद्या हात जोडून उत्स्फूर्त झाल्या असें स्पष्ट दिसतें. ह्यावरूनच सर्व अपरा विद्या परा विद्येंत अंतर्भूत होतात, हा सिद्धांतही पूर्ण अनुभवास येतो.

श्रीमहाराजांनीं विशेषतः आपल्या माधुर्य संप्रदायाकरितां व सर्व मुमुक्षुजनांकरितां फार मोठें वाङ्मय रचून तयार केलें आहे. त्यापैकींच ' संप्रदाय सुरतरु ' या नांवाचा प्रचंड ग्रंथ महाराजांनीं केला असून तोही अपूर्णच राहिला आहे. संप्रदायसुरतरूचा प्रथम भाग यापूर्वींच शके १८५५ सालीं श्री. शं. ज. सोमवंशी यांनीं प्रसिद्ध केला असून त्या भागांत त्या ग्रंथाचीं ४६० पृष्ठें प्रसिद्ध झालीं आहेत. मध्यंतरीं श्री. सोमवंशी यांनीं श्रीमहाराजांच्या वाङ्मयांपैकीं कांहीं ग्रंथांचें मुद्रण केलें असून सांप्रत वाचकांच्या हातीं, संप्रदायसुरतरु या ग्रंथाचा, जवळ जवळ ४७५ पृष्ठांचा दुसरा भाग मुद्रित करून वाचकांचे हातांत ते देत आहेत. मुद्रित ग्रंथसंपत्तीखेरीज श्रीमहाराजांची अमुद्रित ग्रंथसंपत्ति बरीच असून ती सर्व मुद्रित करून वाचकांचे हातीं देण्याचा महनीय संकल्प रा. रा. सोमवंशी यांनीं केला आहे; व ते तो दृढनिश्चयानें, आस्थेनें व श्रीसद्गुरुमाउलीच्या कृपाप्रसादानें पार पाडतील यांत शंका नाहीं.

श्रीमन्महाराजांच्या प्रकाशित ग्रंथांना प्रस्तावना, भूमिका, उपोद्घात वगैरे लिहिण्याचें कार्य महाराष्ट्रांतील प्रथितयश भगवद्भक्त व प्राचीन संत-

वाङ्मयाचें जिवंत स्मारक परममान्य ह. भ. परायण श्री. पांगारकर, औंधचे सुविद्य अधिपति श्रीमंत राजे बाळासाहेब पंतप्रतिनिधि, लोकनायक श्री. बापूजी अणे, नामदार श्रीमंत दादासाहेब खापर्डे आणि मराठी भाषेचे प्राध्यापक श्री. बापूसाहेब चापेकर वगैरे सुविख्यात व श्रेष्ठ प्रतीच्या विद्वान् गृहस्थांनीं आजवर केलें आहे. संप्रदायसुरतरूसारख्या ग्रंथास प्रस्तावना-लेखकही त्याच तोलाचा मिळावयास पाहिजे होता. वाचकांच्या दुर्दैवानें तें काम या वेळेस मजकडे आलें आहे. माझें संतवाङ्मयाचें ज्ञान यथातथाच, प्राचीनशास्त्राचें ज्ञानही आवळ्याएवढें असून, लेखनकौशल्याच्या नांवानेंही शून्यच ! अशा स्थितींत हें काम श्री. सोमवंशी यांनीं मजवर सोंपविलें व मीं तें साहसानेंच स्वीकारलें आहे. ह्यामुळें वाचकांची खात्रीनें निराशा होईल हें मी पूर्ण जाणून आहे. पण ह्या रूपानें तरी श्रीमत् संतवर्य श्री-गुलाबरावमहाराजांच्या सेवेचा योग पदरांत पडेल व मनोमालिन्य दूर होईल, हा लाभ फार मोठा असें समजूनच हें कार्य मीं पत्करिलें आहे.

'संप्रदायसुरतरु' हा ग्रंथ माधुर्य सांप्रदायिकांना आपल्या ऐहिक व परमार्थिक सर्व इच्छा, हेतु पूर्ण करणारा व संप्रदायाप्रमाणें वागणूक ठेवीत असतांना उत्पन्न होणाऱ्या अनेक संशय, दुर्ग्रह वगैरेंचा निरास करून योग्य मार्गावर लावणारा व्हावा व तो सर्व सिद्धिदायक कल्पवृक्षाप्रमाणें उपयोगी पडावा, ह्याच हेतूनें श्रीगुलाबराव महाराजांनीं तयार केला असून, त्याचें नांवही 'संप्रदायसुरतरु,' असें सहेतुक ठेविलें आहे. जवळजवळ हजार पानांच्या ह्या प्रचंड ग्रंथांत अनेक विषयांचा, प्रश्नांचा, संशयांचा व शास्त्रीय कूटांचा, श्रीमन्महाराजांनीं विस्तृत उहापोह केला असून त्या सर्व उहापोहाची फलनिष्पत्ति किंवा निष्कर्ष, भागवतधर्माची किंवा माधुर्य संप्रदायाची सोज्वलता, भगवत्प्रियता आणि शेवटीं मोक्षप्रदता सिद्ध केली असून त्यासाठीं संप्रदायप्रविष्टांनीं आपलें आचरण कसें ठेवावें ह्याचेंही विवेचन केलें आहे; तें करीत असतां स्वतःच शिष्य, वादी, मध्यस्थ व उत्तर-

पक्षी आणि श्रीगुरु, या निरनिराळ्या भूमिका घेऊन आपल्या सर्व शास्त्रावगाहन करणाऱ्या तर्ककर्कश पण मधुराद्वैत भक्तीनें श्रीतातांच्या[1] ठिकाणीं तन्मय झाल्यामुळें अत्यंत मृदुकोमलतेनें, आणि स्वानंदसुखैकमग्न असल्यामुळें प्राप्त झालेल्या ओजप्रसन्नतेनें डवरलेल्या नारिकेलफलसंमित अशा बुद्धीनें ऊहापोह केला आहे.

सांप्रत प्रसिद्ध होणाऱ्या 'सुरतरु' ग्रंथाच्या दुसऱ्या भागांत पहिलें प्रकरण ' स्वाभिमत भागवत धर्म ' हें आहे. इतर धर्मापेक्षां आपणांस भागवतधर्मच कां अभिमत आहे, याचें विवेचन या प्रकरणांत केलें आहे. श्रीमन्महाराज हे पूर्ण सनातनी, वैदिक धर्मानुयायी, अद्वैतमार्गी असून भागवतधर्मभक्त आहेत हें कांहीं कोणास सांगावयास पाहिजे असें नाहीं. त्यांना भागवत धर्मच कां स्वाभिमत झाला हें सांगतांना महाराज म्हणतात:—

"श्रुति, स्मृति, सदाचार । हे धर्माचे तीन विहार । श्रुति स्वतंत्र, स्मृति श्रुतितंत्र । आणि श्रुतिस्मृतितंत्र सदाचार ॥२५॥ परी या तिहींचीही गति । दुर्लभ न कळे आम्हांप्रती । श्रुतींत विकल्प नाना रीति । भाष्यकार ओढिती अर्थ त्यांचे ॥२६॥ स्मृतिही असती अनेक । परी तयांची एकवाक्यता देख । अतिदुर्घट सकळिक । घडेचि पै ॥ २७ ॥ आणिकही एक धर्माची रीति । कवणें प्रतिबंध कवणें निवृत्ति । कवणें योगें कवण प्राप्ति । हे न कळे स्थिति अळुमाळ ॥२८॥" या अडचणींमुळें अडून गेलेल्या संत्रस्त मुमुक्षूला, विचारवंताला आणि निर्व्वळ अज्ञजनानांही उपयोगी पडणारा हा भागवत धर्मच स्वाभिमत होय. याकरितांच धर्माचें लक्षण, " आतां धर्म म्हणजे काय । तो कैसा रीती होय । कवण कीजेल उपाय । कृपा करोनी मज सांगा " ॥१९॥ असा शिष्यपक्ष उत्पन्न करून, " ज्यानें सत्व उपजे चित्तीं । किंवा जयानें उपजे विरक्ती । किंवा इंद्रियें रोधलिया जाती । तो धर्म चित्तीं ओळखे तूं ॥२२॥ ज्याचें फळ ब्रह्मज्ञान ।

---

१ श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या.

तोचि गा धर्म जाण । जो आचरितां नारायण । चरणरतो उपजे तो धर्मु ॥ २३ ॥"

या भागवतधर्माचा आश्रय केल्यानें कर्माच्या फळाची भगवंताला अपेक्षा नसते. " यालागीं कर्माचें फळ । भक्तासाठीं नापेक्षी घननीळ । येथें प्रमाण आहे सबळ । त्रिपुररहस्यवचन ॥ ६६ ॥

ज्ञात्वा सर्वात्मना तस्य योगक्षेमवहो भवेत् ।

अप्रतीक्ष्य कर्मपाकं नियतिं स्वां विधूय च ॥

( त्रिपुररहस्य, अ. ७ )

या भगवंताच्या योगक्षेमवहनाच्या प्रतिज्ञेवर भार घालून पण आपल्या भागीं सर्वात्मत्व न बाणल्याची कांहींही क्षिती न बाळगतां, व बाणण्यासाठींही सत्प्रवृत्त न होतां ऐदीपणानें राहण्यास सवकलेल्यांचाही महाराजांनीं निषेध केला आहे.

या भागवत धर्माचे ठिकाणीं अभिक्रमांचा नाश नाहीं, प्रत्यवाय नाहीं. थोडासा देखील धर्म आचरल्यानें मोठ्या भयाचें निरसन होतें. डोळे झाकून भागवत धर्मानें गेलें असतां स्खलन किंवा पतन नाहीं. कारण,

यानास्थाय नरो राजन् न प्रमाद्येत कर्हिचित् ।

धावन्निमील्य वा नेत्रे न पतेन्न स्खलेदिह ॥

असा अत्यंत बिनधोक्याचा, सरळ व धोपट राजमार्गासारखा 'भागवतधर्म' आहे. याचें सुंदर विवेचन वाचकांनीं मुळांतच पहावें.

या भागवतधर्माप्रमाणें आचरण करतांना प्रयत्न, प्रारब्ध, नियति यांच्या गुंतागुंतींत मन अडकवून न ठेवतां भगवन्निष्ठाला प्रारब्धाच्या पराजयाकरितां प्रयत्न व नियतीची अनुकूलता वगैरेंची जरूरी लागत नाहीं. कारण प्रारब्ध व नियति ह्यांची अडचण परमेश्वरभक्तिविमुख जो असेल त्यांना उत्पन्न होते. आपल्या अत्यंत उत्कट भावानें श्रीमार्कंडेयानें प्रारब्ध व नियति, कीं ज्यांचें फळ मृत्यु हेंच होतें, त्यांचें उल्लंघन केलेंच कीं नाहीं ! आणि म्हणूनच महाराज म्हणतातः—

"तयाच्या निष्कामोपासनेचें विघ्न । स्वयेंचि निवारी नारायण । स्वयेंचि पूर्ण करी साधन । फलदानासवेंचि तें ॥ १३४ ॥ येथ म्हणती टीकाकार । कीं दैवनियती नाशोनि समग्र । फल द्यावया स्वतंत्र । परमेश्वर हा मूलार्थू ॥ १३५ ॥

सर्व दुःखांचा नाश व सर्व सुखांचा लाभ मिळवून देणारीं कर्म व ज्ञान हीं साधनें असतांना, भक्तीची व भक्तिप्रधान भागवतधर्माची जरूरी काय? असा प्रश्न आपणच उत्पन्न करून, "तंव वादी म्हणे कर्मज्ञान । असतां भक्तीचें काय कारण । सिद्धांती म्हणे कर्म अपूर्ण । सर्वदाचि रहात ॥ १६२ ॥ वासनाक्षयासाटीं । अवश्य भजावा जगजेटी । तेणेंचि उघडे विज्ञानपेटी । अहेतुका ॥ १६३ ॥" असें भक्तीचें महत्त्व वर्णून महाराजांनीं वासनांचे, देहवासना, लोकवासना व शास्त्रवासना हे तीन प्रकार; त्यांतील देहवासना, तिचे आत्मवासना व संबंधीवासना असे दोन प्रकार, आत्मवासनेचे लौकिक व शास्त्रीय असे दोन भेद, संबंधीवासनेचे लौकिक व शास्त्रीय असे दोन भेद यांचें सुंदर वर्णन करून या वासनांचें भागवतधर्मपद्धतीनें कसें नियमन करावें याचाही उलगडा फार मार्मिकपणानें केला आहे; ( पृष्ठ १८–१९ ) दुसरी लोकवासना. ही तर कधींच तृप्त होत नाहीं. कारण—

विद्यते न खलु कश्चिदुपायः सर्वलोकपरितोषकरो यः । सर्वथा स्वहितमाचरणीयं किं करिष्यति जनो बहुजल्पः ॥ (तत्त्वानुसंधानसार पान ३२७) याचेंच वर्णन, सर्वथा लोक संतोषतील मनीं । ऐसा उपाय नाहीं त्रिभुवनीं । संतोषं जनयेत्प्राज्ञः इत्यादि वचनीं । आत्मसंतोष मात्र दर्शविला ॥१९२॥ याप्रमाणें करून,

क्षणाद्भवंति सुहृदो भवंति रिपवः क्षणात् ।
तोषस्थाने प्रकुप्यंति दुराराधाः पृथग्जनाः ॥

असा अश्वघोषचरितांतील श्लोक उध्दृत केला आहे. तुकाराम महाराजांनींही—

" लोक जैसा ओक धरितां धरवेना, " असें व श्रीभवभूतीनेंही:-" सर्वथा व्यवहर्तव्यं, कुतो ह्यवचनीयता ।
........... साधुत्वे दुर्जनो जनः ॥ "

असें वर्णन केल्याचें प्रसिद्धच आहे. व लोकहिताकरितांच लोकांचे पुढारी होणारांनाही या संतोक्तीचा सध्यांचे काळीं रोकडा अनुभव येतच आहे. यावरून लोकवासना ही किती दुःसाध्य आहे हें सिद्ध होतें.

तिसरी शास्त्रीय वासना. हिचेही पाठवासना, अर्थवासना व अनुष्ठानवासना असे भेद सांगून त्या सर्वच वासना पूर्ण होणें अशक्य आहे हेंहि भरद्वाज व इंद्र यांची आख्यायिका देऊन महाराजांनीं स्पष्ट केलें आहे. विस्तारभयास्तव मी उतारे देत नाहीं.

सारांश, कर्म व ज्ञान या दोन्ही मार्गांपेक्षां भक्तिप्रधान भागवतधर्मच साधकास श्रेयस्कर आहे, हें महाराजांनीं साधार सिद्ध करून दिलें आहे.

अशा भागवतधर्माचें सामान्य लक्षण कोणतें, याचें उत्तर—

" ये वै भागवता प्रोक्ता उपाया ह्यात्मलब्धये ।
अजः पुंसामविदुषां विद्धि भागवतान् हि तान् ॥ ३४ ॥

भागवतस्कंध, ११ अ. २

"कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा बुध्यात्मना वा अनुसृतःस्वभावात् । करोति यद्यत्सकलं परस्मै नारायणायेति समर्पयेत्तत् ॥" ( भागवत स्कंध ११.) या श्लोकांनीं महाराजांनीं देऊन श्रीनारायणाची किंवा श्रीहरिहरांची उपासना तन्निष्ठैकवृत्तीनें करणें हाच मुख्य भागवतधर्म होय. या तन्निष्ठैकवृत्तीमुळें वैराग्य व अहेतुकज्ञान यांची प्राप्ति सहजीं होते व भक्त कृतार्थ होतो. मग तो भक्त साधनचतुष्टय संपादन करून उत्तम उपासनेनें सगुणसाक्षात्कारसंपन्न झालेला व वासनाक्षय आणि मनोनाशाच्या अभ्यासाची अपेक्षा नसलेला मुख्याधिकारी असो किंवा येथपर्यंत ज्याची तयारी नाहीं असा सामान्य इसम असो.

या भागवतधर्माशिवाय इतर धर्मांचा, मोक्षसाधन म्हणून आश्रय करणें कसें कठीण आहे याचें मार्मिक विवेचन वाचकांनीं सर्वेंद्रियांचे डोळे करून हातीं असलेल्या ग्रंथांतून पहावें.

कोणी हा भागवत धर्म श्रुतिपादित नाहीं असा आक्षेप घेऊन श्रुतिबाह्य धर्माचें आचरण हा धर्म नसून अधर्मच होय; व अशा अधर्माच्या आचरणानें अभ्युदयनिःश्रेयससिद्धि कशी होईल ? असा प्रश्न विचारतील; त्याला, कलिसंतरणोपनिषच्छ्रुतीचा आधार देऊन हा भागवतधर्म श्रुत्युक्त आहे असें महाराजांनीं सिद्ध करून उत्तर दिलें आहे.

" देवांत शिवविष्णु ब्रह्म यम । ऋषींत सनत्कुमार नारद शुकादि परम । दैत्यांतही प्रल्हाद-बिभीषण । बळीआदि सप्रेमविवादरहित महाजन भक्त ॥ हें श्रुतीचें रहस्य यथार्थ जाणोनि । श्रुतीतें प्रमाणाचि करोनि । विचारती विवादरहित होवोनि । आणि ऐसेही जे कोणी असती ॥ ते आघवेचि भगवद्भक्त । महाजन बोलिजती समस्त । म्हणोनि तिहीं दाखविला जो पंथ । तो धर्म भागवत सेवावा ॥ कृतयुगीं प्रल्हाद सुमती । त्रेतायुगीं हनुमान शबर्यादि होती । द्वापारीं गोपिका उद्धवमूर्ति । कलींत विभूति नामदेवादि ॥ २९३ ॥ एवं चहुंयुगीं भागवतधर्म । महात्मे आचरती सप्रेम । कलींत विशेष तारक परम । हें कलिसंतरणश्रुति सांगे ॥२९४॥ "

असा श्रुत्युक्त, निरपाय व सर्वजनसामान्य हा भागवतधर्म सर्वांनी सेवावा व महाराजांच्या संप्रदायांत प्रवेश करूं इच्छिणाऱ्यानें तर त्याची दीक्षा घ्यावी असा महाराजांचा सर्वांना कळकळीचा संदेश आहे. महाराज म्हणतात, " म्हणवोनि विनवीं सकळां जनां ॥" सकळां जनांस म्हणजे कोणांस ? फक्त हिंदूंस ? नाहीं ! महाराज याहीपुढें जाऊन म्हणतात कीं—
" आर्यां आणि यवनां । तुम्ही या भागवतधर्म सुगुणा । आश्रयावें ॥३१९॥

तुम्ही आर्य असा, यवन असा, तांत्रिक असा कीं मांत्रिक असा, तसेंच तुम्ही स्वकर्मनिरत ब्राह्मण असा कीं क्षत्रिय असा, वैश्य असा कीं शूद्र

असा, स्त्री असा कीं पुरुष असा, तसेंच पापी असा कीं पतित असा, विधवा असा, त्यक्ता असा कीं अत्यक्ता असा, या सर्वांनीं लौकिकाची लाज सांडून, स्वर्गकामना दूर झुगारून देऊन आणि अनुतप्त होऊन अनन्य भावानें या भागवतधर्माचे अनुयायी व्हावें.

"ऐसा हा भागवत धर्म । जेथ करतळीं फळ मेघश्याम ॥
तो आश्रयारे सप्रेम । वारंवार विनवी तुम्हां ॥ ३७१ ॥"

हा महाराजांचा संदेश श्रीमद्भगवद्गीतेच्या

" मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः ।
स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम् ॥"

या वचनावर भरंवसलेला आहे, हें कोणाच्या ध्यानांत येणार नाहीं ! या प्रकरणाचे शेवटीं भगवत्सेवा करण्याच्या १ लालन, २ वात्सल्य, व ३ माधुर्य या तीन पद्धतींपैकीं आपल्या आवडीप्रमाणें अथवा तीनही पद्धतींनीं श्रीहरिहराची उपासना सांप्रदायिकांनीं करावी. "आतां स्वसंप्रदायाची रीति । जैसी जयाची असेल भक्ति । त्यांतील मुख्य निवडोनि प्रीति । तीन प्रतिनिधि करावे ॥ ३७६ ॥ लालन वात्सल्य माधुर्य व्यक्ति । एकेक कार्य प्रत्येकाप्रती । भगवत्सेवाविभाग प्राप्त । करावा कीजे ॥ ३७७ ॥ वात्सल्य असेल जयाचें । त्या पुरुषानें अथवा स्त्रियेनें साचें । सकाळीं उठोनि भगवंताचें । पूजन कीजे बाळभावें ॥ ३७८ ॥ एवं वात्सल्यभक्ति देवा । प्रातःकाळीं अर्पावी बाळसेवा । माध्यान्हकाळीं राजसेवा । लालन-भक्तें समर्पिजे ॥ ३७९ ॥ रजनीमाजी कांतसेवा । मधुरें समर्पिजे देवा । ऐसिया रीतीं वासुदेवा । हृदय-ठेवा करावें ॥ ३८० ॥

याप्रमाणें श्रीमहाराजांनीं आपल्या संप्रदायाला भागवतधर्मच स्वाभिमत कां आहे व इतर धर्म अभिमत कां नाहींत, याचें आपल्या सांप्रदायिकांकरतां व सर्वांकरितांही या प्रकरणांत विस्तारानें विवेचन केलें आहे, आणि सर्वांना भागवतधर्माचाच आश्रय करण्यास आग्रहानें विनविलें आहे.

यापुढील भागवतधर्मवैशिष्टय, भागवतधर्मप्रकार, पंचविध भगवद्भजन, मानसपूजारहस्य व स्वेष्ट हरिहरोपासना या पांच प्रकरणांत महाराजांनीं पंचायतन पूजेचा हरिहरोपासनेंत अंतर्भाव, वर्णाश्रमधर्म व भागवतधर्म, सांप्रदाय व वर्ण, ब्राह्मणब्राह्मणेतरवाद, यति व गृहस्थ, मूर्तिपूजा व मानसपूजा स्मार्तमोक्षधर्म व भागवतधर्म, भगवद्भजनाचे अभिगमनादि पांच प्रकार इत्यादि विषयांचें मोठें मार्मिक विवेचन केलें आहे.

पंचायतनपूजेचा हरिहरोपासनेंत अंतर्भाव करतांना गणपति हा कृष्णाचाच एक अवतार आहे असें ब्रह्मवैवर्त पुराणाचा आधार देऊन सिद्ध केलें आहे. त्याचप्रमाणें सूर्यही श्रीअप्पय्या दीक्षितांच्या शिवकर्मणिदीपिकेंत शिवरूप किंवा हरिस्मृतींत विष्णुरूप असल्याचें वर्णन आहे, त्यामुळें त्यांचा या दोघांतही समावेश होऊं शकतो. श्रीदेवी ही देखील 'कृष्णस्तु कालिका साक्षात् रामात्रिपुरसुंदरी' या तंत्रवाक्याच्या आधारानें कृष्णरूपांत अंतर्भूत होते व अशा तऱ्हेनें हरिहरोपासनेंत पंचायतनपूजा अंतर्भूत होत असल्यानें सांप्रदायिकांनीं हरिहरोपासना करावी असें महाराजांचें सांगणें आहे.

श्रुतिस्मृतिप्रतिपादित वर्णव्यवस्था असतांना संप्रदायादिकांची जरूरी काय? व या संप्रदायाचा चार वर्णांतच समावेश करावयाचा किंवा स्वतंत्र वर्ण म्हणून त्यांना मानावयाचें ? या शंकेचेंही महाराजांनीं उत्तर दिलें तें असें:— "सिद्धांती म्हणे पुससी काय। वर्ण आणि संप्रदाय। शब्दार्थेचि भिन्न होय। ऐक सोय तयांची ॥८॥ वर्ण म्हणजे जन्मसंस्कारावच्छिन्न। किंवा कोणी म्हणती गुणकर्मभेदें करून। संप्रदाय गुरुपरंपरास्थान। यालागीं भिन्न दोन्हीही ॥९॥ वर्णे कर्माधिकार होय प्राप्त। संप्रदाय प्रकटे मोक्षार्थ। वर्णी गायत्रीमंत्राचि विहित। संप्रदायाभिमत इष्टदेवमंत्र ॥१०॥ मोक्षाधिकारी चारी वर्णी। तेथ संप्रदाय प्रवर्ते तिया स्थानीं। प्रकटावया लागुनी। हाच हेतु ॥ ११ ॥ वेद असतां कां प्रकटणें। हा प्रश्नचि न शोभे अनुगुणें। कल्पानुसार साध्य साधनें प्रकटतीं अवघें ॥१२॥

श्रीमहाराजांना ब्राह्मणब्राह्मणेतर वाद हा मुळींच मान्य नव्हता. त्यांनीं आपल्या वाङ्मयांतून या वादाचा बऱ्याच ठिकाणीं ऊहापोह केला आहे. महाराजांचे हयातींत ब्राह्मणब्राह्मणेतर वाद बराच चिघळला होता; व ब्राह्मणेतर मंडळी महाराजांना आपल्या पक्षांत येऊन मिळण्याबद्दल आग्रहही करीत होती असें दिसतें व त्यामुळेंच त्यांना आपल्या वाङ्मयांत ह्या वादाचा समतोल बुद्धीनें विचार करणें भाग पडलें. महाराज जन्मजात वर्णव्यवस्था किंवा गुणकर्मपक्षीय वर्णव्यवस्था या दोन्ही पक्षांचाही विचार करून या वादाचा ऊहापोह करितात आणि योग्य ब्राह्मण व सद्गुणी शूद्र यांचा सन्मान सर्वांनीं समतोलपणें करावा असें उपदेशितात. शास्त्रांत जन्मजात वर्णव्यवस्थेला जरी अग्रपूजेचा मान असला, तरी खरी योग्यता गुणांनाच आहे. सर्वांनीं गुणोपार्जन करण्याकडे दृष्टि ठेवावी. महाराज म्हणतात,

" अरे सच्छूद्रासि काळेंकरून । जितक्या शीघ्र उपजे ज्ञान । पतित ब्राह्मणासि त्याहून । काळ लागे अत्यंत ॥ ४९ ॥ येथ आहेचि समता । सर्वथा नाहीं विषमता । धर्मभांडण करोनि वृथा । समाजव्यवस्था नाशूं नये ॥ ५० ॥ **नीचत्व जावें, आशा मनीं । तरी कोणींही व्हावें सद्गुणी । गुणांची मुद्रा त्रिभुवनीं । स्वयेंचि जनीं मान्य होय ॥६२** तैसें ब्राह्मणाच्या ईर्ष्येवरी । सद्गुण वाढविशील जरी । मान मिळेल तुजही तरी । शंका अंतरीं धरूं नको ॥८९॥" याच विषयाचा विचार, ' संप्रदाय-विशेष निष्ठा ' या प्रकरणांत बराच विस्तृतपणानें केला आहे. ( पृष्ठ १६० ते १६५ ) तोही अवश्य पहावा.

महाराजांनीं विशेषतः संप्रदायांतील कोणींही संन्यासग्रहण करूं नये असें स्पष्ट सांगितलें आहे, तेंही अत्यंत मार्मिकपणाचें आहे यांत शंका नाहीं.

"निःशेष भोगाची नाहीं निवृत्ती । इंद्रियांचा विश्वास जंव नाहीं चित्तीं । तंव कदापि होऊं नये यति । विवाहरीति उत्तम ॥ ५० ॥ यति होऊन भक्ती न घडतां । तरी आघवें जीवित गेलें वृथा । सकुटुंब भागवत होतां ।

तरी वंशीं कोणी भक्त निघेल ॥ ५१ ॥ जयाची निरपेक्ष आहे वृत्ति। तेणें अवश्य व्हावें यति। बाह्यसेवाप्रधान व्हावें गृहस्थीं। योगप्रधान यति असावा ॥ ५२ ॥ पराभक्तींत दोन्ही सम। परी कलीमाजीं सकुटुंब घ्यावें नाम। जंव न जिंकविती क्रोधकाम। तंव संसारीं राम भजावा ॥ ५३ ॥ मुख्य धरावी भगद्भक्ति। गौण करावी प्रपंचासक्ति। अर्ध क्षण राधापति। विसरूं नये ॥ ५४ ॥ ( अ. १७ )

भगवंताच्या उपासनेचे, प्रतिमापूजन व मानसपूजन असे दोन मार्ग आहेत. त्यांत मानसपूजा ही फार कठीण व सामान्यास दुःसाध्य असल्यानें त्यानें बाह्यपूजा म्हणजे मूर्तिपूजाच करणें श्रेयस्कर आहे. मूर्तिपूजा हें मानसपूजेचें साधनही होऊं शकतें.

" मूर्तिपूजा करोनि आधीं। मानसपूजा पावती सिद्धि। मग ती होवोनि ज्ञानावधि। तीव्ररूपें भगवत्सिद्धि मूर्तीतही ॥६२॥ बाह्यमूर्तीचा उपदेश। देव म्हणतां ठसे विश्वासियास। आणि मानसमूर्तीचा करितां उपदेश। देव तूं कल्पना करीं म्हणावें लागे ॥ ७५ ॥"

परंतु परमेश्वरमय अंतःकरण बनत चालल्यावर प्रेमानें जर, ' अनुरागें हृदयींच राहे मूर्ती। दवडलियाही न होय परती। या अनुभवा तुलसिदास वदती। ऐसी होतां वृत्ति मानससेवाचि कीजे ॥८५॥ उपदेशें तीव्र बाह्यमूर्ति। प्रेमें तीव्र मानसमूर्ति। मिळालिया ज्ञानभक्ति। ब्रह्मरूप काया ही ॥८६॥"

पण हा महाराजांचा उपदेश, " ईश्वर व धर्म दोन्ही नाहींत, ईश्वर हें थोतांड व धर्म म्हणजे अफूची गोळी आहे. " या मतांचा पगडा ज्या लोकांवर दिवसेंदिवस पडत चालला आहे, त्या लोकांनीं अवश्य ह्याचा विचार करावा अशी लेखकाची विनंति आहे.

"भागवत धर्माचें सर्वप्राबल्य," ह्या अध्यायांत 'भागवत धर्म हा श्रुतिबाह्य व भागवत ग्रंथ हाही श्रुतिमूलक नाहीं,' या आक्षेपास फारच सुंदर व समर्पक उत्तर देऊन आक्षेपकांचें तोंड बंद केलें आहे. महाभारतांतर्गत

शांतिपर्वांतील ३४८ व्या अध्यायामध्यें, "संमितस्सामवेदेन पुरैवादियुगे कृतः। धार्यते स्वयमाशेन राजन्नारायणेन च ॥" या श्लोकांत, भीष्माचार्यांनीं या भागवतधर्मास, 'सामवेदसंमित' असें संबोधिलें आहे, त्यावरून व त्याही-पेक्षां गोपालतापनीयोपनिषत्, कलिसंतरणोपनिषत्, कालाग्निरुद्रोपनिषत् वगैरे, उपनिषदांतून या भागवतधर्माचाच उपदेश असल्यानें हा धर्म श्रौत असून, श्रीमद्भागवतग्रंथालाही श्रुतित्वच प्राप्त होतें, हें ज्याला संशयास्पद वाटत असेल, त्याला महाराज विचारतात, " उत्तम म्हणजे वेदधर्माहूनि उत्कृष्ट। आन अर्थ आहे स्पष्ट। ईश्वरीं अर्पितां पूर्त इष्ट। तरी वेदही भागवत होतु का ॥ ४५ ॥ वेद भागवत स्वतःप्रमाण। मुलमूलीभावाचें नाहीं कारण। कोणी म्हणेल अप्रमाण वेदबाह्य म्हणोन। तरी भागवतबाह्य वेद अप्रमाण कां न होती? ॥"

यानंतर महाराज स्पष्टच विचारतातः—" वेद म्हणजे काय। मंत्र कीं ब्राह्मण होय। कीं दोनाचि आन नोहे। तरी हें न घडे ॥" यानंतर महाराज वेदाची व्याख्या पुढीलप्रमाणें करतात— " जीवोद्धारासाठीं शब्द। तो तो अवघा बोलिजे वेद। आतां भागवतीं वेदस्तुति विशद। ते वेदीं निदशवत् ॥ ४८ ॥" यापक्षांही हा भागवतधर्म श्रुतिधर्माच्याही अगोदरचा आहे असें ठरवितांना महाराज म्हणतातः— " आता आग्रहाच कारशील जरी। आम्हीं आग्रहेंचि बोलूं तरी। वेदापूर्वी कृतयुग निर्धारीं। भागवत-धर्मचि पैं होता ॥५७॥ येविषयीं भागवतप्रमाण। आणि श्रीधराचें भाष्यही जाण। तेंही सावध करी श्रवण। धरी मौन मग वादिन् ॥ ५८ ॥

आदौ कृतयुगे वर्णो नृणां हंस इति स्मृतः।
कृतकृत्याः प्रजा जात्या तस्मात् कृतयुगं विदुः ॥
वेदः प्रणव एवाग्रे धर्मोऽहं वृषरूपधृक्।
उपासते तपोनिष्ठा हंसं मां मुक्तकिल्बिषाः ॥

त्रेतामुखे महाभाग प्राणान्मे हृदयात् त्रयी ।
विद्या प्रादुरभूत्तस्या अहमासं त्रिवृन्मखः ॥

यामुळें, " त्रेतारंभीं झाले वेद तीन । तयांपासोनि यज्ञ उत्पन्न । तेव्हां धर्मक्रिया लक्षण । शब्दार्थ आन स्पष्ट असे ॥ एवं कृतयुगीं नव्हता । कलियुगीं नासेल तत्वतां । ऐसीया मध्यप्रवृत्ता । धर्माधर्म कवण म्हणे ? ॥ ७६ ॥" परंतु हा श्रुतिधर्मावरचा मध्यप्रवृत्त दोष भागवत धर्मावर मात्र येऊं शकत नाहीं, म्हणून श्रुतिधर्मापेक्षां भागवतधर्मच सर्वश्रेष्ठ होय असें आग्रहपक्ष स्वीकारून महाराज म्हणतात. या प्रकरणांतच या सात्वत धर्माचा संप्रदाय श्रीनारायणमुखांतून प्रथम निघाल्यापासून इक्ष्वाकुपावेतों कसकसा चालत आला हें शांतिपर्वाच्या आधारानें सांगितलें आहे.

यानंतरचे या ग्रंथांतील २० व २१ हे दोन अध्याय इतके मोठे आहेत कीं, या दोन अध्यायांत या ग्रंथाचीं १६० ते ४०२ इतकीं पृष्ठें खर्चीं पडलीं आहेत. विसाव्या अध्यायाचें, 'संप्रदाय विशेषनिष्ठा' व एकविसाव्याचें 'ईश्वर म्हणजे कोण' अशीं नावें आहेत. पैकीं २१ वा अध्याय अपूर्णच राहिला आहे. या दोन्ही अध्यायांत महाराजांनीं अनेक विषयांचा-विशेषतः शास्त्रीय विषयांचा फार पांडित्यपूर्ण विचार केला असून आपल्या पक्षाचें, युक्ति व शास्त्र या दोन्ही दृष्टींनीं, प्रस्थापन केलें आहे. या दोनही प्रकरणीं महाराजांचें अलोट बुद्धिवैभव, सर्व शास्त्रावगाहनत्व व वादविवादपटुत्व सर्वोत्कृष्टपणें अनुभवास येऊन त्यांचेपुढें नतशिरस्कच व्हावें असें वाटूं लागतें. या दोन्ही प्रकरणांतील सारांश काढावयाचें जरी मनांत आणिलें तरी केवळविस्तार याहीपेक्षां दुप्पट तिप्पट करावा लागेल. याशिवाय सर्वसामान्यपणें ग्रंथाचें तात्पर्य प्रस्तावनेंत पाहणारास तें जरूरीचेंच असेल असें वाटत नसल्यानें, या दोन्ही प्रकरणांतील फक्त सामान्य व सर्व लोकोपयोगी अशा विचारांचा अगदीं थोडक्यांत उल्लेख करण्याचें योजिलें आहे.

'संप्रदाय विशेषनिष्ठा' या अध्यायांत प्रथम ब्राह्मण व शूद्र यांचा विचार

केला असून त्यानंतर सहा प्रकारच्या वैष्णवांचे, श्रीमज्जगद्गुरु आचार्यांनीं केलेलें खंडन, त्यांत श्रीआचार्यांनीं केलेली वितंडा आणि अर्थांची व शब्दांची ओढाताण याविषयींचा उहापोह करून महाराजांनीं पोटीं प्रेम व मनीं श्रद्धा ठेवून श्रीमदाचार्यांचा घेतलेला समाचार व दाख-. विलेली मतभिन्नता मूलग्रंथांतच वाचावी.

'धार्मिकांचे प्रकार' याविषयीं सांगतांना, " जो चारी पायीं मोकळा। जेथ निवृत्ती सर्वथा अवकळा। तो धर्मचोर म्हणावा सगळा। सगळीं गिळिजे ॥ जो एवढा झाला नास्तिक। जया न शके बांधूंही चार्वाक। अर्थकाम सोडोनि सम्यक्। मलतेंचि करी ॥" या वर्णनावरून तें सर्व बंधनाच्या पलीकडे जाऊं पाहणाऱ्या हल्लींच्या प्रवृत्तीचेंच वर्णन आहे असें वाटूं लागतें. चार्वाक्, पशुयाजिक, वामपंथी, श्रौतपांचरात्र, श्रौतपाशुपत, अश्रौतपांचरात्र, व अश्रौतपाशुपत, बौद्ध व अर्हत् हे सर्वच धर्म किंवा संप्रदाय त्रिकांडसमवृत्तीचे नाहींत. कारण कोणांत पशुद्रोह, कोणांत सत्वगुणी उपासनेचा व कर्माचा अभाव, कोणांत सात्विक उपासना आहे पण कर्म व ब्रह्मज्ञान नाहीं, कोणांत ब्रह्मज्ञानाचा व उपासनेचा अभाव असून कर्म मात्र अहिंसक आहे. पूर्वमीमांसाचार्य जैमिनी, उपासना व ज्ञान मानीत नाहींत. निरीश्वर सांख्य उपासना मानीत नाहींत. सेश्वर सांख्य कर्मोपासना मानतात. ज्ञानाची मातब्बरी धरीत नाहींत. यामुळें कोणीच त्रिकांडसमवृत्ति नाहींत. जो धर्म किंवा संप्रदाय कर्म, उपासना व ज्ञान या तिन्ही कांडांत समवृत्ति ठेवितो, तोच खरा त्रिकांडसमवृत्ति संप्रदाय होय. तसा भागवतधर्म त्रिकांडसमवृत्ति आहे. कारण "कर्म नाहीं हिंसक। उपासना सात्विक। ब्रह्मज्ञान सम्यक्। केवलाद्वैत" ॥ २८६ ॥ येथें भागवतधर्माचा खुलासा करतांना, "भागवत नोहे पांचरात्र। श्रीमद्भागवत महापुराण पवित्र।" असा स्पष्ट निर्देश महाराजांनीं केला आहे.

भागवतधर्मात सर्व वैदिक, अवैदिक धर्मांचा व पंथांना समावेश सांसर्गिक व आरोपित अशा दोन पद्धतींनीं करतां येतो. " ज्या आगमागमांचा असलेला भेद त्यांच्या विरोधास न होणारा असेल अशांचा समावेश भागवतधमात करणें, तो सांसर्गिक समावेश होय. जसें पाशुपत व पांचरात्रिकांचें एकीकरण. त्याचप्रमाण आश्रय देऊन बलनाबलानें समावेश करणें याला आरोपित समावेश म्हणतात. तो सर्व मार्गांचा समावेश आम्ही भागवतधर्मात करतों असें महाराज म्हणतात, व जगांतील बौद्धधर्म, ईशुख्रधर्म, पारशी धर्म व महंमदीधर्म या चारी धर्मांतून भक्तिपंथतत्त्व मान्य करील तर त्यापैकीं कोणालाही अधिकार आहे असें ते सांगतात. याच प्रसंगीं महाराज म्हणतात, " जातिवादानेंच आम्ही दुसऱ्याला आमच्या जातींत जबरदस्तीनें घेत नाहीं, याचें कारण उच्चनीचभाव किंवा द्वेष नसून ज्या ज्या धर्माचे जे जे लोक असतील त्यांनीं त्यांनीं आपला धर्म तीव्र श्रद्धेनें पाळावा म्हणजे जन्मांतरीं किंवा स्वर्गांत त्या सर्वांचा मेळ होईल. आज एक व उद्यां दुसरा अशा प्रकारचें धर्मांतर करीत सुटूं नये. आम्ही कोणाचा धर्म मोडण्याची मनानेंही इच्छा करीत नाहीं. त्याचप्रमाणें आमचाही धर्म मोडण्याची कोणीं इच्छा करूं नये, येवढीच विनंति आहे. याप्रमाणें प्राचीन आर्य मतास अनुसरून सर्व धर्मांचा हा समन्वित विचार महाराजांनीं केला आहे. आमच्या धर्मांत सर्व धर्मांचीं तत्त्वें संकलित झालीं असल्यानें तीं सर्व आम्हांस प्राप्तच आहेत. त्यामुळें कोणापासून समजून घेण्याचीही अपेक्षा नाहीं. ( पृष्ठ २४१ ).

सांप्रदायिकांनीं आपला व्यवहार, आचार, वर्तन, कसें ठेवावें हेंहि याच अध्यायांत महाराजांनीं सांगितलें आहे. " धर्मद्वेष करूं नये। धर्मांतर करूं नये। समाजक्षोभ करूं नये। कांहीं केल्या ॥ ४११ ॥ रोगी आणि म्हातारा। नपुंसक तिसरा। चवथा समाधिस्थ बरा। हिमालयस्थ मात्र ॥ ४२० ॥ हे चवघे वेगळे करोनी। सर्व मानिया संप्रदायजनीं। विवाह

करावा निश्चयें करोनी । संन्यास कदा घेऊं नये ॥ ४२१ ॥ जयासि वाटे ब्रह्मचर्य पाळावें । त्यानेंही लग्न करावें । अपत्य झालिया असावें । वृद्ध तोंवरी स्त्रीसवेंचि ॥ ४२२ ॥

तसेंच–'तितकें करावें धेनुपालन । बुद्धीविण वाद करूं नये ॥
भगवी करोनी छाटी । भिक्षा मागों नये तंबाखूसाठीं ॥
उगीच एकंकार करूं नये । जातिहावेंही भरूं नये ॥
कुरूप सद्‍गुणी कामिनी । परी ते सांडूं नये निर्वाणीं ॥
दुर्गुणी सुरुप म्हणोनि । अंगिकारूं नये ॥ ४८८ ॥
पिकदाणीच्या रूपासाठीं । सांडूं नये धनरक्षक लोहपेटी ॥
अतिसुरूप कर्कशा पाठीं । लावूं नये ॥ ४८९ ॥

प्रसंगीं औषध होय विष । म्हणोनि निरुपयोगी न म्हणावें कवणास ॥ आपण परतंत्र होऊं नये । दुजिया परतंत्र करूं नये । स्वातंत्र्याहंकारें भरूं नये । आडदांडसें ॥ ४९४ ॥ अहित कोणाचें करूं नये । तरी शठासि सारल्य धरूं नये । दैवें प्रयत्न सांडूं नये । यत्नगर्वें भगवन्निष्ठा मोडूं नये ॥ निश्चयें भाक्षिया संप्रदायीं । झाड एक जो रिकामा राही । ज्ञानी वा धर्मी वा सुखार्थ स्वपरदेहीं । भ्रमत जावें ॥ ५६४ ॥ दडोनियां श्वासोच्छ्वास । उगेचि करों नये उपवास । जोंवरी झाला नाहीं विशेष । हिमवन्निष्ठ ॥ ५७४ ॥"

"परांच्या कुलयुवती । भ्रष्टवूं नये ॥"

तथापि कोणी स्वधर्मीयांनीं किंवा विधर्मीयांनीं बलात्कारानें भ्रष्टविल्यास तर त्यांचें काय करावें ? या प्रश्नास महाराजांचें उत्तर पुढीलप्रमाणें आहे:–
"ज्या बलात्कारें भ्रष्टविल्या । योग्य प्रायश्चित्त दिधलिया । पतिव्रता होती" ॥ ६९३ ॥ रागयोगें विषयभोग । याचेंचि नांव पापचांग । इच्छा असतां विषयभोग । तरी तें पाप नोहे, पापफळ ॥ ६९४ ॥ कित्येक स्त्रिया नामरक्षणीं । बलात्कारें भ्रष्टवितां कोणी । प्राण देती तेचि क्षणीं । ते

अति अनुचित करणी । मी म्हणे ॥ स्वयें पातक न करितां । दुजियानें करवितां । तें प्राण देणें पातक तत्वतां । हें शंकरानंद बोलिले आत्मपुराणीं ॥ ६९६ ॥ पश्चात्ताप झाला जयासी । तया तारक असतां हृषीकेशी ।प्राण देणें महापापासी । मूळ कां करावें ? ॥ ६९७ ॥

संतुष्टो भार्यया भर्ता । भर्त्रा भार्या तथैव च ।
यस्मिन्नेतत्कुले नित्यं त्रिवर्गस्तत्र वर्धते ॥
यदा भर्ता च भार्या च परस्परवशानुगौ ।
तदा धर्मार्थमोक्षाणां त्रयाणामपि संगमः ॥

धर्म तो सत्याचा । अर्थ तो सत्यासत्याचा । काम तो असत्याचा । विढार होय ॥ ७३७ ॥ ऐसे तिन्ही पुरुषार्थ । परस्परविरोधी यथार्थ । परी स्त्रीपुरुष संतुष्ट जेथ। तेथ ते मिळती ॥७३८॥" असे किती उतारे द्यावे ? मोह आवरत नाहीं. हा सर्वच भाग अत्यंत उपयुक्त व फार सुंदर आहे. वाचकांनीं तो मूळांतूनच वाचावा.

'ईश्वर म्हणजे कोण' या प्रकरणांत श्रीमहाराजांनीं आपल्या वादकुशलतेचें स्वरूप प्रकट केलें आहे. ईश्वर म्हणजे कोण ? ईश्वर आहे यास प्रमाण काय ? ईश्वर अल्पज्ञ कीं सर्वज्ञ, ईश्वर व्यापक आहे कीं नाहीं, ईश्वर स्वतंत्र कीं परतंत्र, ईश्वर न्यायी कीं दयाळू ह्या प्रश्नांची, तसेंच लोकायतिक, बौद्ध व जैन यांच्या मतांची या प्रकरणांत फारच विस्तृत चर्चा केली आहे चर्चा करतांना न्यायकुसुमांजलि, सांख्यदर्शन, योगदर्शन, सर्वदर्शनसंग्रह, बादरायणसूत्रें,भाष्य,सांख्यसारवार्षण्यस्मृति,न्यायमकरंद,विष्णुपुराण,सिद्धांतदर्शन, खंडनखंडखाद्य,खंडनोद्धार, अद्वैतसिद्धि, नागार्जुनाची आलोकमाला, आप्तमीमांसा जैनग्रंथ, प्रमेयकमलमार्तंड, तत्वार्थसूत्र वगैरे ग्रंथांचा आधार व वचनोद्धार केला आहे. आणि सर्व मतांचा निरास करून ईश्वराचें अस्तित्व व अद्वैतसिद्धांताचें प्रस्थापन पहिल्या पद्धतीतील पंडिताप्रमाणे अनेक कुकिवादानें सिद्ध केलें आहे. हें सर्वच प्रकरण गहन विषयांचें शास्त्रीय

भाषेनें व पद्धतीनें विवेचन करण्यांत खर्ची पडलें असून वादविवादाची कंडू शमन करणारें व पंडितश्रेष्ठांच्या अंतःकरणसंहित माना डोलविण्यास लावणारें आहे तितकेंच तें सामान्य जनांच्या बुद्धिमर्यादा ओलांडणारें आहे. परमेश्वर किंवा कोणी एक विशिष्ट शक्ति जगाचें आदिकारण आहे असें, निरनिराळे पर्याय देऊनही सर्वांना मानावें लागतेंच लागतें हें अनेक उदाहरणें देऊन महाराजांनीं सर्व मतांचा समन्वय केला आहे. हा सर्व वादविवाद मुळांतूनच समजून वाचण्यांत मोठी गोडी आहे यांत शंका नाहीं.

यानंतरच्या या ग्रंथांतील शेवटच्या ( २२ व्या ) अध्यायांत गुरु व शिष्य, उपासनेची रीति, ढोंगी गुरु, अनेक गुरु, लोभी गुरु, शिष्यांचें जातकर्म व नामकर्म, शिष्यांचा मंत्रसंस्कार, द्वादशाक्षरमंत्र, श्रीकृष्णाचे मंत्र वगैरे संप्रदायविधींचा समावेश केला आहे व अध्यायाचें नांवही, ' संप्रदायविधि ' असेंच ठेविलें आहे.

श्रीगुलाबरावमहाराजांच्या एकंदर बहुतेक वाङ्मयावरून ते अद्वैतवादी पण भक्तिमार्गी, त्यांतूनही ज्ञानोत्तरभक्तिवादी असून भक्तिमार्गांतील, लालन, वात्सल्य व माधुर्य या तीन पद्धतींपैकीं माधुर्य सांप्रदायांचे पुरस्कर्ते आहेत हें पदोपदीं प्रत्ययास येतें. ' ज्ञानदेव तु कैवल्यं ', व ' तस्य कार्यं न विद्यते ' या सिद्धांताप्रमाणें ज्ञानोत्तर कर्तव्य मग तें कर्मात्मक असो किंवा भक्त्यात्मक असो, कांहींही रहात नाहीं, या सिद्धांतास श्रीगुलाबराव महाराजांची मान्यता दिसत नसून ज्ञानोत्तरभक्ति अवश्य करावीच ती केल्याशिवाय चालत नाहीं हाच त्यांचा मुख्य सिद्धांत आहे. महाराज म्हणतात, " जीवन्मुक्त्यर्थ हरिहरभक्ति ज्ञानोत्तर आम्ही मानतों. " ( पृष्ठ १८६ ) " ज्ञानावांचून मुक्ति होत नाहीं. " हें आचार्यांचें म्हणणें आम्हांसही मान्य आहे. परंतु जीवन्मुक्तीत भक्ति पाहिजे असें षट्पदीस्तोत्रांत आचार्य स्वतः म्हणतात. ( पृष्ठ १८९ ). बाळ, उन्मत्त व पिशाच या तीन अवस्थांत किंवा सदाज्ञानमय अशा समाधि अवस्थेंत तो सिद्ध वास्तव-

कृपार्चे कसा असतो हें उलगडणें फार कठिण असल्यानें, त्या त्या अवस्था पूर्ण ज्ञानस्वरूप आहेत असें मानिलें तरी व्युत्थानानंतरच्या स्थितींत त्या सिद्धाला भक्तिमार्गाचीच अपेक्षा असते असें महाराजांचें म्हणणें आहे. बरें, सर्वच सिद्ध ' बालोन्मत्तपिशाच ' या अवस्थेंतील असतात व सर्वच मुक्त सदासर्वकाळ पूर्ण ज्ञानसमाधींतच असतात असें मानतां येत नाहीं. असाही सिद्धांचा किंवा मुक्तांचा एक वर्ग असूं शकतो कीं जो अंतस्त्यागी व बहिःसंगी आहे. साक्षात् श्रीप्रभु रामराय व परमयोगींद्र श्रीप्रभुगोपाल कृष्ण, श्रीभगवान् वेदव्यास, श्रीशुकाचार्य, श्रीमुनीश्वर नारद, श्रीराजेश्वर जनक, प्रत्यक्ष श्रीमदाद्यशंकराचार्य, आधुनिक साधुपरंपरेंतील श्रीभगवद्भक्त निवृत्तिनाथ, श्रीज्ञानेश्वरमहाराज, श्रीएकनाथ, श्रीतुकाराममहाराज, श्रीसमर्थ रामदास तसेच अगदीं अलीकडचे म्हणजे श्रीरामकृष्ण परमहंस हा तो वर्ग होय. या वर्गांतील सर्व पुरुषांना बालोन्मत्तपिशाच ही अवस्था किंवा केवळ सर्वकाळ समाधिस्थितावस्था या दोन्हीही लागू नसून हे सर्वच स्थितप्रज्ञ योगारूढ किंवा योगप्रवर्तक असूनही लोकसंग्राहक प्रवृत्तीचे असल्यानें अशांचा एक स्वतंत्र वर्गच असूं शकतो हें स्पष्ट आहे. अर्थात् या वर्गांतील स्थितप्रज्ञालाही व्युत्थान अवस्थेमध्यें म्हणजेच लौकिक जागृदवस्थेंत भक्तीची कास धरावीच लागते असें महाराजांचें म्हणणें आहे, व यालाच ज्ञानोत्तर भक्ति म्हणतात व तिची ' ज्ञानादेव तु कैवल्यं ' हा अंतिम सिद्धांत मान्य करूनही, आवश्यकता सिद्ध होते, असें त्यांचें मत आहे. अर्थात् ही भक्ति लालनरूप असावी कीं माधुर्यरूप असावी हाही प्रश्न उत्पन्न होतो. पण महाराजांनीं या ग्रंथांत ज्यांची ज्यांची याविषयीं आवडी असेल व योग्यता असेल तशी त्यांनीं भक्ति करावी असें सांगून ठेविलें आहे. स्वतः महाराज माधुर्य भक्तीचे परमप्रेमी होते व त्यांनीं आपणासाठीं याच भक्तीची निवड केली होती. आपणास श्रीभगवंताची पत्नी समजून भगवंताचे ठिकाणीं त्या भावनेनें

रममाण होणें हा ह्या भक्तींतील विशेष होय. पण ही भावितही सामान्यां-करितां नसून संप्रदायांत महाराजांसारख्या ज्या विभूति असू शकतील त्यांचेकरतांच ती होय, असें महाराजांचें स्पष्ट निवेदन आहे. नवविध भक्तीपैकीं आत्मनिवेदन भक्तीची पराकोटि म्हणजे माधुर्यभावित होय असें मला वाटतें. व्यवहारांतही माता, मित्र, पुत्र व दास हे चौघे; मुलगा, स्नेही, माता व पिता व मालक ह्यांचेसाठीं आत्मनिवेदन कांहीं अंशीं करूं शकतात; पण पत्नी, आपल्या पतीसाठीं प्रत्यक्ष स्वताचें शरीर, वित्त व सर्व आयुष्य यांचें पूर्णपणें निवेदन करूं शकते व तें खरोखरीचें आत्म-निवेदन होतें, असा आपणा आर्यधर्मीचा व धर्मीयांचा इतिहास सांगत आहे. तर भगवंताचे ठिकाणीं खरोखरीचें आत्मनिवेदन माधुर्य भक्तीनेंच करतां येतें. या हेतूनें महाराजांनीं या मधुराद्वैत भक्तीची आपणासाठीं निवड केली व आपल्या सांप्रदायिकांतील स्वतांप्रमाणेंच विशिष्टत्व पावले-ल्यांसाठीं ती उपदेशिली आहे. या सर्व ग्रंथांतील हा महत्वाचा भाग आहे.

आतां या ग्रंथराजास प्रस्तावना लिहिण्याचें धाडस मी केलें किंवा मला करावें लागलें, तें केवळ विषयाची आवड, श्रीगुलाबराव महाराजांसंबंधीं पूज्यबुद्धि व माझे मित्र रा. रा. दिनकरराव गोखले व रा. रा. सोमवंशी यांचा आग्रह, यांमुळेंच होय. ग्रंथ खरोखर अत्यंत मोठा, गहन विषयांच्या गहन विचारांनीं भरलेला, भक्तिरसानें ओथंबलेला, सदुपदेशानें नटलेला, तीव्र बुद्धिमत्तेच्या जोरावर तर्काच्या कसोटीस घासून पारखलेला असा अस-ल्यानें त्याची प्रस्तावना लिहिण्याचें काम माझ्यासारख्या अल्पज्ञ व बहु-व्यवसायी माणसाचें नव्हे हें मी जाणून आहें. ज्या ग्रंथराजाचें जनकत्व श्रीगुलाबरावमहाराजांकडे आहे त्याची थोरवी मीं काय वर्णावी ? त्यांच्याच मुखांतून ती ऐकिली असतां तिचें महत्व समजून येईल. महाराज म्हण-तातः—"मनुष्यांमाजी पाहतां। मज सत्याचि नाहीं कोणी शिकविता। ग्रंथ वाचवोनि तत्वतां। लिहिला अर्थ हेंही सत्य ॥ ४३५ ॥ परंतु अचाट

माझी बुद्धि । वाचकांसही नकळे जो विधि । तो आकळूनियां आधीं । समन्वयीं ठाके ॥ ४३६ ॥ कांहीं अधीतही वाचक मज मिळाले । मजपरीस संस्कृत शिकले । परी तिहीं वाचितां अर्थ सांगितले । निर्भ्रम त्यांचि तद्ग्रंथींचे ॥४३७॥ रूपावलीची पूर्ण विभक्ति । गुरुपदसाक्ष ठाउकें नाहीं मंजप्रती । परी महाभाष्यांतीलही विरोधगति । महाराष्ट्र भाषेंत सांगूं शकें ॥ ४३८ ॥ ही मज मति कैशी मिळाली । ते तातकरणी ( श्रीज्ञानेश्वर महाराज ) तातांसचि भली । बहु काय, जिहीं किंचित् विद्या शिकविली । तेही त्यां शिष्य केले स्वबुद्धीनें ॥ ४४० ॥ धर्मविचाराचे ठायीं । मज भ्रम नुपजे सर्वथा कांहीं । गुणदोषविचार महंतांचाही । सत्यवतीकुमारसम पुढें ठाके ॥ मनुष्यांत जे जे गुरु केले । तेथ माझें समाधान नाहीं झालें । चतुरक्षरी देऊनि अंगिकारिलें । तातें एवढें मात्र सत्य ॥ ४४२ ॥ इतुका उनाड असूनि पोटीं । तातें अंगिकारिलें शेवटीं । येणेंचि विश्वास हृदयसंपुटीं । कीं मधुराद्वैत चालवील प्रभु ॥ ४४३ ॥"

अशा योग्यतेच्या सद्गुरुमाउलीच्या प्रसादानें धन्य झालेल्या, मधुराद्वैतभक्तीचें अमृतपान करणाऱ्या महात्म्यानें रचिलेल्या ग्रंथास मी पामर प्रस्तावना ती काय लिहिणार? परंतु ही अल्पसेवा घडली यांतच मी धन्यता मानीत आहे. या प्रस्तावनालेखानें, या ग्रंथराजाचें स्वरूप वाचकांस थोडक्यांत समजून येऊन जर त्याच्या वाचनाची व त्यांत प्रतिपादन केलेल्या भक्तिमाहात्म्याची आवड उत्पन्न होईल, तर मी स्वतांस धन्य समजेन. या प्रस्तावनालेखास मुद्रणसुलभ स्वरूप देण्याचे कार्यांत माझे मित्र रा. रा. द. धों. पुराणीक यांनीं फार मेहनत घेतली, याबद्दल त्यांचा, तसेंच माझे स्नेही रा. रा. दिनकरराव गोखले व रा. रा. सोमवंशी यांचाही मी फार आभारी आहें.

श्रीरामनवमी, शके १८६०. वामनशास्त्री दातार वैद्य नाशीक.

---



श्रीज्ञानेश्वरी माउली

# प्रकाशकाचें हृद्गत

वैराग्यें रक्षावी ज्ञानवृत्ति । भक्तीनें रक्षावी विरक्ति ॥
परी जे असती शुष्क वेदान्ती । तयां सुखप्राप्ति हे नव्हे ॥

( श्रीज्ञानेशराजा )

सत्य संकल्पाचे दाते भगवान श्रीवासुदेव व तदर्धांगी श्रीज्ञानेशराजा यांच्या कृपाप्रसादानें हातीं घेतलेल्या श्रीमत् सद्गुरु गुलाबरावमहाराजांच्या ग्रंथावलीपैकीं " संप्रदायसुरतरु, भाग २ " हा भाग उशीरा कां होईना वाचकांच्या हातीं देण्यास मला आनंद वाटत आहे.

कोणतेंही सत्कार्य हातीं घेतलें कीं, निष्ठेची कसोटी म्हणून संकटें मागोमाग ठेविलेलींच. तदनुसार या वर्षीं माझ्या उद्दिष्ट कार्यांत अनेक संकटांनीं मला सतावून सोडलें. पण श्रीमाउलीच्या कृपेनें बहुतेकांतून मी पार पडत आलों व राहिलेल्या कांहीं अडचणींतूनही पार पडेन अशी आशा आहे. अभिवचन दिलेल्या माझ्या उदार आधारस्तंभाकडून आजतागायत कांहींच मदत मिळाली नाहीं. अस्तु. दयाघन प्रभु माझी या ग्रंथकार्यार्थीची निष्ठा पाहून त्यांच्या अंतःकरणांत मजकडे कृपादृष्टीनें बघण्याची प्रेरणा करो. एवढें सांगून आतां मी ग्रंथाचे हृद्गताकडे वळतों.

सदरहू ग्रंथ श्रीगुलाबरावमहाराजांच्या ग्रंथमालेपैकीं ओवीबद्ध व म्हणूनच

कदाचित् नव सुशिक्षितांस क्लिष्ट वाटण्याचा संभव असला तरी अत्यंत श्रेष्ठ आहे. श्रीसमर्थांच्या दासबोधाप्रमाणें श्रीज्ञानेश्वरप्रासादित हा ग्रंथराज होय. मज अज्ञाची तर अशी समजूत आहे कीं, अशा तर्ककुतर्कांनीं माजलेल्या बजबजपुरीच्या कालात श्रीज्ञानेश्वरीचें भाषाकाठिण्य व तींतील गूढ प्रेम यांचा उलगडा होणें उचित होतें म्हणूनच कीं काय, सदरहू वाङ्मय श्रीज्ञानेश्वरमाउलीनें आपल्या कन्येच्या मुखांतून प्रसृत करविलें. ह्या माझ्या बोलाचें प्रत्यंतर मार्मिक वाचकांना ग्रंथावलोकनानें अनुभवितां येईलच.

भौतिक ज्ञानापलीकडे पराविद्याज्ञान म्हणून कांहीं आहे आणि केवळ प्रापंचिक सुखलाभापेक्षां परमार्थलाभच खरा श्रेयस् आहे, अशा अनुतापदग्ध मनोवृत्तींतच या ग्रंथांतील प्रमेयबीजें रुजतील. मग तो जिज्ञासु कर्मपतित अथवा जातिपतित असो किंवा ज्याला श्रौतमार्गाचा अधिकार नाहीं असा शाक्त, दुराचारी चतुर्वर्णी, वेश्या, अंत्यजादिक कोणीही असो. लौकिक विषयाचरण सोडून त्या सर्व आचरणांत एक परमेश्वर आलंबन ठेविल्यानें याच जन्मीं वैदिक गति कशी मिळवितां येईल हें सांगणारा हा अपूर्व ग्रंथ होय.

दीनता व अनन्यतापूर्वक संप्रदायांतील जें इष्ट त्याची सेवा करूं इच्छिणाऱ्यास या संप्रदायांत ( ज्ञानोत्तर भक्तिपूर्ण भागवत संप्रदाय ) प्रविष्ट होतां येतें. 'संप्रदायसुरतरु' सोडून श्रीमहाराजांचे जेवढे ग्रंथ आहेत ते सर्व संप्रदायांतील फल जें माधुर्यभक्ति तत्प्रतिपादक आहेत व 'संप्रदायसुरतरु' हा ग्रंथ तन्मार्गप्रतिपादक आहे. या माधुर्य संप्रदायांतील फलरूप मंतव्य व साधनरूप मंतव्य नवीन नसून त्याचें सोपपत्तिक व सप्रमाण प्रतिपादन मात्र नवीन आहे, हें श्रीमहाराजांनीं ठिकठिकाणीं सांगून ठेविलें आहेच. व तत्पुष्ट्यर्थ पूर्वाचार्यांचीं व श्रुतिपुराणांचीं प्रमाणेंही दिलीं आहेत. म्हणून हा संप्रदाय वेदभिन्न आहे असें मात्र कोणीं समजूं नये. अर्थातच पूर्वाचार्यांना संमत असल्यामुळें व श्रुतिपुराणांत ह्याचा निर्देश असल्यामुळें

हा संप्रदाय अनादि आहे असें श्रीमहाराजांनीं सिद्धहि करून दिलें आहे. खरें पहातां सदरहू संप्रदाय शंकराचार्यांनीं स्थापिलेल्या वैदिक केवलाद्वैत-संप्रदायाहून निराळा नाहींच.

अलीकडे ' संप्रदाय ' हा शब्द फार तिरस्करणीय होत चालला आहे सांप्रदायिक दृष्टि म्हणजे कांहीं तरी आग्रह व तो त्या त्या संप्रदायप्रवर्तक जीवाचाच असल्यामुळें, सांप्रदायिक दृष्टि त्याज्य आहे असें कित्येक म्हण-तात; पण हा समज, आपल्या बुद्धीच्या जोरावर तत्त्व शोधून काढूं अशी ज्यांना घमेंड आहे त्या लोकांचाच होतो. वास्तविक पाहतां कोणतेंही ध्येय सांप्रदायिकरीत्याच कळतें. कारण ध्येय म्हटलें कीं, त्यांत दोन अंश असतात; एक साध्यनिरूपणांश व दुसरा साधननिरूपणांश. अगदीं ताजें वाचकांपुढें मांडावयाचें म्हणजे महात्मा गांधींनीं आपणा स्वतांकरितां व आपल्या अनुयायांकरितां कांहीं नियम आंखले आहेतच कीं नाहींत ? ती त्यांची नियमबद्ध रहाणी हा सद्यःकालीन एक नवा संप्रदायच म्हणतां येईल.

सर्वांना जरी एकच ध्येय मिळवावयाचें असलें, तरी एकाच मार्गानें एकदम तें ध्येय प्राप्त करून घेण्याइतकी प्रत्येक व्यक्तिमात्राची योग्यता नसते; म्हणून निरनिराळ्या व्यक्तीला ज्याच्या त्याच्या अधिकारानुसार क्रमानें किंवा एकदम ध्येयप्राप्ति करून देण्याकरितां जे साधनमार्ग निर्माण होतात, या सर्वांना संप्रदाय संज्ञा असते. त्यांत कांहीं संप्रदाय श्रुत्युपजीवी आहेत व कांहीं श्रुतिबहिर्भूत आहेत. केवलाद्वैत संप्रदाय श्रुत्युपजीवी असून साक्षात् ध्येयसाधक आहे व इतर क्रमिक आहेत. याचा विचार श्रीमहा-राजांनीं या ग्रंथांत केला आहे. वस्तूच्या अपरोक्षत्वाला हा साधनांश विशेष महत्त्वाचा असल्यामुळें संप्रदायाची वाट धरिल्याशिवाय वस्तुलाभ नाहीं असें श्रीमुकुंदराजांनींही म्हटलें आहे. ( आधीं आत्मयातें जाणावें । मग त्यातें साधावें । एरवीं नुसतें अनुभवावें । काय धरूनी ॥ ) सारांश,

पारमार्थिक फलप्राप्ति असो किंवा व्यावहारिक फलप्राप्ति असो, हा नियम सर्व ठिकाणीं सारखा लागू आहे. व्यवहारांतील ट्रेडसिक्रेट संप्रदायाचीच साक्ष पटवितें. याविषयीं श्रीमहाराजांनीं आपल्या व्यवहारधर्मबोध ग्रंथांत चांगलाच खुलासा केला आहे. म्हणून वाचकवर्गाला नम्र विज्ञप्ति कीं, संप्रदाय तिरस्करणीय नसून परमार्थांत आवश्यक आहे.

परमार्थफलसाधन प्रगट करणें हें काम जगच्चालक ईश्वराचें आहे. कारण जीव जरी यथार्थ मुक्त झाला, तरी तो जीवन्मुक्त आहे तोंपर्यंत मुख्य जगच्चालकत्व त्याच्याकडे येत नाहीं. म्हणून जगदुत्पत्ति, स्थिति, लय व कल्याणाचा मार्ग प्रकट करणें हीं कार्यें जीव करूं शकत नाहीं, ईश्वरच करूं शकतो. म्हणून " युगान्तेऽन्तर्हितान्वेदान्सेतिहासान् महर्षयः । लेभिरे तपसा पूर्वमनुज्ञाताः स्वयंभुवा ॥ " या भारतवाक्यांत व त्याच्या पुढील श्लोकांत सर्व दर्शनें, सर्व शास्त्रादिक, परमेश्वरच प्रवर्तकद्वारा प्रवृत्त करतो असें सांगितलें आहे. म्हणून प्राचीन असो किंवा नंतरचा असो, सर्व संप्रदाय कल्पीं कल्पीं परमेश्वराविष्ट प्रवर्तकद्वारा निर्माण होत असल्यामुळें अनादि आहेत. अलिकडील संप्रदायांचा कोण्या तरी पूर्वसंप्रदायांत किंवा पौराणिक दोन संप्रदायांच्या कोडळ्यांत समावेश होतो. सूतसंहिता, यज्ञवैभवखंड, अ. २० मध्यें सर्व मार्गांना यथाधिकार प्रामाण्य सांगून सर्वांचा प्रवर्तक परमेश्वरच आहे असें दाखविलें आहे. याप्रमाणें सर्व संप्रदाय जरी परमेश्वरापासून निघाले असले तरी संप्रदायांतर करणें मात्र श्रद्धास्थैर्याला घातक असल्यामुळें योग्य नसतें. म्हणून स्वसंप्रदायांतच दृढ श्रद्धा रहावी एवढ्याकरितां सांप्रदायिकांचे खंडणमंडण प्रकार असतात. केवलाद्वैत संप्रदाय जरी इतर सांप्रदायिकांनीं खंडण केला असला तरी केवलाद्वैत मंडण करणाऱ्या श्रुति, युक्ति व अनुभव या प्रमाणत्रयापुढें त्यांचें खंडन फिकें पडतें. म्हणून केवलाद्वैत संप्रदायच अंतिम ठरतो.

अलिकडे भक्ति हें ज्ञानाचें साधन आहे, म्हणून ज्ञानानंतर भगवद्भक्तीची

अपेक्षा नाहीं; व ज्ञानानें सर्व सगुणाचा बाध होत असल्यामुळें भगवंताच्या सगुण मूर्तीचाही बाध होतो. म्हणून ज्ञानानंतर भगद्भक्ति रहाणें शक्य नाहीं असें पुष्कळ ज्ञानी समजतात. हें अज्ञान दूर करण्याकरितां " सत्यपि भेदापगमे " " मुक्ता अपि लीलया विग्रहं कृत्वा भजंते " इत्यादि आचार्योक्तींत " ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा " इत्यादि भगवदुक्तींत " तैशी क्रिया करी न साहे । परी अद्वैतीं भक्ति आहे ॥" इत्यादि श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या ओवींत व आणखी पुष्कळ साधुसंतांच्या उक्तींत असलेली व केवलाद्वैतांत होणारी ज्ञानोत्तर भक्ति, परमेश्वरांनींच श्रीज्ञानेश्वरकन्यारूपानें अवतार घेऊन प्रमाणपुरःसर या ग्रंथांत प्रतिपादिली व तत्प्रतिपादक आपल्या मार्गाला माधूर्यसंप्रदाय हें नांव दिलें. या माधूर्यसंप्रदायांत 'सुरतरु' हा ग्रंथ वरुस्थानीं असून " प्रीतिनर्तनादि " ग्रंथ फलस्थानीं आहेत व फलस्थानीय माधूर्यप्रेमाची मनोरथपूर्ति या सुरतरूच्या साह्यानें होत असल्यामुळें याला " सुरतरु " हें नांव अन्वर्थक दिलें गेलें आहे.

या माधुर्य संप्रदायाला " भागवत संप्रदाय" हेंही एक दुसरें नांव आहे. किंवा भागवत संप्रदायालाच श्रीमहाराजांनीं आपल्या उपास्याचे ठिकाणीं वसत असलेल्या अत्युत्कट प्रेमभावामुळें 'माधूर्य संप्रदाय' असें नांव दिलें आहे असें म्हटलें तरी चालेल. तरी पण ज्ञानपूर्व व ज्ञानोत्तर अशा दोन्ही भक्तींचा भागवत संप्रदायांत समावेश होतो व " माधूर्य संप्रदाय' हें नांव महाराजांनीं ज्ञानोत्तर भक्तिमार्गालाच दिलें आहे. ज्ञानपूर्व भक्तीचा सर्व स्वीकार करितात, पण ज्ञानोत्तर भक्तिमार्गाचा कित्येक स्वीकार करीत नाहींत किंवा ती वगळली गेली आहे. म्हणून श्रीमहाराजांनीं भागवत संप्रदायांतर्गत ज्ञानोत्तर भक्तीचें सोपपत्तिक विवेचन करून त्या मार्गाला हें नांव ठेविलें आहे. ज्ञानोत्तर भक्ति होऊं शकते कीं नाहीं, तिचें स्वरूप कसें, इत्यादि प्रश्नांचें विवेचन 'सुरतरु' व्यतिरिक्त ग्रंथांत प्राधान्यानें आलें आहे.

सुरतरु हा ग्रंथ ( भाग १ व २ ) सांप्रदायिक असल्यामुळें, श्रीकृष्ण, श्रीज्ञानेश्वर महाराज, शिव, उमा व गोपिका हें पंचायतन ज्यांचें इष्ट नाहीं त्यांनीं हा ग्रंथ अवलोकन करूं नये असा शपथपूर्वक निर्बंध श्रीमहाराजांनीं केला आहे. असें करण्याचें कारण, कोणी संप्रदाय सप्रमाण खोडून काढील ही भीति नसून, श्रीमहाराजांच्या तर्कगाढतेस भुलून इतर संप्रदायिकांनीं स्वसंप्रदायाचे ठिकाणीं चंचल बुद्धि होऊं देऊं नये, हें आहे. या टीका-कारांना टीका करण्याकरितां त्यांचे इतर ग्रंथ मोकळे आहेत. वर भागवत संप्रदायाचा उल्लेख आला आहे. तेथें द्वैती भागवताचा संप्रदाय विवक्षित नसून, भागवत पुराणांत प्रतिपादिलेला 'अद्वैत भागवत संप्रदाय'च विवक्षित आहे. या माधूर्य संप्रदायाच्या अधिष्ठात्री देवता गोपिका आहेत व शिव-विष्णु समान उपास्य आहेत. या ग्रंथांत आधुनिक आंग्लविद्याविभूषित लोकांकडून आपल्या धर्मावर, ज्ञानावर व भक्त्यादिकांवर जे आक्षेप केले जातात, त्या सर्वांचे उत्तम रीतीनें निराकरण केलें आहे. या ग्रंथाचे 'पूर्व-विहार' व ' उत्तरविहार ' असे दोन भाग होणार होते, पण श्रीमहा-राजांच्या आजारामुळें ' पूर्वविहार ' झाल्यानंतर ' उत्तर विहारां'चे एक दोन अध्याय होऊन पुढें आमच्या दुर्दैवानें ग्रंथलेखन बंद पडलें. पूर्वविहारांतहि एक आगमाध्याय व उत्तर विहारांतील एकवीस बावीस अध्याय कांहीं अंशानें अपुरे राहिले आहेत.

ग्रंथगौरव या नांवानें आजतागायत मिळविलेल्या अभिप्रायांची सारांश-रूपानें आम्हीं पुस्तिका काढली आहे. सारांश म्हणजे जवळ जवळ १/७ ते १/६ मजकूर घेतला तरी ४०-५० पानें भरलीं; यावरून वाचकांच्या ध्यानीं सदरहु ग्रंथमालेचें अलौकिकत्व येईलच. यांत विद्वत्कुलशेखर कै० चिंतामणराव वैद्य व साहित्याचार्य श्री. तात्यासाहेब केळकरांसारखे विद्वान् व चिकित्सक लोक अभिप्रायदाते आहेत हें विसरतां कामा नये. असें अस-तांही, मोठ्या खेदानें नमूद करावें लागतें कीं, जनतेचें या वाङ्मयाकडे

जावें तसें लक्ष अजून गेलें नाहीं. सद्वाङ्मय हें राष्ट्रबलतेजवृद्धिदायक असतें. मनोबल, त्यागवृत्तीशिवाय नुसत्या शरीरबलानें कार्यें होत नसतात. माहात्म्यपद मनोबलानेंच मिळवितां येतें. शरीरबलानें नव्हे; व तें कमावण्यास सद्वाङ्मयाची राष्ट्राला अत्यंत आवश्यकता आहे. मागील इतिहास ध्यानीं आणतां राष्ट्राच्या अवनतीच्या काळीं श्रीसंतवाङ्मयानें वीरवृत्तीचा—त्यागवृत्तीचा, दुसऱ्याकरितां प्राणाची आहुति देण्याचा मार्ग दर्शविला. तेव्हां असें वाङ्मय जिवंत ठेवण्याकरितां प्रत्येकानें झटणें हें जीवितांचें मुख्य कर्तव्य होय. यास्तव वाचकवृंदाला नम्र प्रार्थना आहे कीं, हल्लीं ग्रंथखप जो २००–२५० पर्यंत तो निदान दुपटीनें तरी वाढवावा; म्हणजे माझें काम जें रेंगाळत, तोट्यांत चाललें आहे, तें नेटानें चालविण्यास मला आशीर्वाद दिल्यासारखें होईल.

लेख फार लांबला तरी लिहिल्याशिवाय रहावत नाहीं कीं, या सत्कार्यीं निरपेक्षपणें मदत करणाऱ्यांपैकीं प्रमुखत्वानें ज्यांचा उल्लेख करितां येईल असे वैद्यरत्न श्री. दातारशास्त्री हे होत. श्रीगुलाबराव महाराजांचें नांव ऐकतांच ज्यांच्या डोळ्यांतून नकाश्रु ढळतात, अशा एकास प्रस्तावना लिहिण्याची परोपरीनें विनंति केली होती, ती त्यांनीं ऐनवेळीं नाकारल्यानें मी मोठ्या चिंतेंत पडलों. श्री. दातार शास्त्रीपुढे नुसत्या एका शब्दानें माझा चिंतारोग मांडला; तोंच एकाद्या दयाळु आईप्रमाणें मान्य करून, सद्वैद्य रोग्याच्या आरोग्याकरितां जितक्या प्रेमानें झटतात, तितक्या कळकळीनें रात्र-पहाट करून, माझी चिंता, प्रस्तावना लिहून दूर केली, याबद्दल त्यांचा फार ऋणी आहे.

ज्यांची या कार्यीं अगदीं आरंभापासून मला फार फार मदत आहे अशा व्यक्ति म्हणजे श्री. मांढरे व श्री. वा. मा. जोशी हे होत. नित्य परिचयामुळें त्यांच्या नामांचा येथें उल्लेख करणें म्हणजे बंधूनें प्रपंचांत मदत केली असतां जसें कोणी उल्लेख करीत नाहीं तसें आहे. त्यांचा ना मानिर्देश

करणें म्हणजे त्यांच्या उपकृतीला उणेपणा आणणें होय. म्हणून त्यांचे बाबतींत मौन स्वीकारणेंच बरें.

श्रीज्ञानेश्वरमाउलीची खालील अभंगरूपानें प्रार्थना करून त्यांचेजवळ पसायदान मागतों. तदनंतर भागलेल्या मनास त्यांच्या नामामृतांत विराम देतों.

अभंग

( १ )

वंदितों पादुका ठेवोनिया माथा ।
आळंदीच्या नाथा दास तुझा ॥ १ ॥
वर्णावया तुझें सामर्थ्य मजला ।
नाहीं पामराला शक्ति कांहीं ॥ २ ॥
तुझा अवतार जनउद्धारार्थ ।
असे सर्वश्रुत संत लोकां ॥ ३ ॥
महाराष्ट्रभुवनीं संतीं कृपा केली ।
शिवरायकालीं अवतरोनी ॥ ४ ॥
तसाच प्रसंग आजवरी आहे ।
म्हणोनी मी बाहें तुम्हां बापा ॥ ५ ॥
परंतु माझिये गांठीं नाहीं पुण्य ।
तुमचें दरशन व्हायाजोगें ॥ ६ ॥
या कारणें देवा अल्पशी ही सेवा ।
ग्रंथद्वारें राया आरंभिली ॥ ७ ॥
वाङ्मयपुष्पें तुझिया कन्येचीं ।
गुंफण्या मीं साचीं घेतलीं कीं ॥ ८ ॥
बाबाजी महाराजें पावन मज केलें ।
सेवामत दिलें आचाराया ॥ ९ ॥

अंतर न पडो कोण्याही संकटीं ।
नढळो चित्तवृत्ति कांहीं झाल्या ॥ १० ॥
होऊं तूं दयाळे ज्ञानेश माऊले ।
पुरवा वेल्हाळे आर्त माझी ॥ ११ ॥

( २ )

घरोघरीं व्हावा प्रसार ययाचा ।
जनमल साचा वारावया ॥ १ ॥
ज्ञानसूर्यतेज तळपोनी अवनीं ।
दुरितें जळोनि खाक होवो ॥ २ ॥
तेणें देवा होवो जनमनशुद्धि ।
वाढोनी सुबुद्धि शांति नांदो ॥ ३ ॥
रुजो वैराग्य परमार्थाच्या ज्ञानें ।
जेणें दिनें दिनें हृष्ट प्रजा ॥ ४ ॥
संत बापमाय अवतरोत मग ।
सुखी सर्व जग करावया ॥ ५ ॥
आनंदी आनंद सर्व देशीं होवो ।
वैरभाव जावो एकमेकां ॥ ६ ॥
तुझीया प्रसादेंविण नोहे गोष्टी ।
वाऊगी चाउटी भौतिक ज्ञानें ॥ ७ ॥
असा हा सर्वांच्या अंतरीं प्रकाश ।
पडूं दे देवेश संतश्रेष्ठा ॥ ८ ॥
पायोंनि शंकर पायीं ठाय मागे ।
करी जग जागें आत्मज्ञानें ॥ ९ ॥
ॐ शांतिः शांतिः शांतिः ।

संतसुहृदांचा म्हणियारा प्रकाशक.

श्रीज्ञानेश्वर माउली

# विषयानुक्रमाणिका



## उत्तर विहार.

सारूप्यं तव पूजने शिव महादेवेति संकीर्तने ।
सामीप्यं शिवभक्तिधुर्यजनतासांगत्यसंभाषणे ।
सालोक्यं च चराचरात्मकतनुध्याने भवानीपते ।
सायुज्यं मम सिद्धमत्रभवति स्वामिन्कृतार्थोऽस्म्यहम् ॥२८॥

याचा स्पष्टार्थ व्युत्पन्न[1] जाणती । बहुत संस्कृत न ये मजप्रति । परी याचि लोकीं चान्ही मुक्ति । भगवत्सेवेंत होती अभिप्राय हा ॥ १०० ॥ आणखी एक रहस्य पूर्ण । जयाचा गुरुवचनीं विश्वास गहन । तयातें आधींचिपासोन । साधों शके मानससेवा ॥ १०१ ॥ बाह्य प्रतिमेच्याहि ठायीं । भगवद्बुद्धिचि उपजे पाहीं । अस्तित्वोपदेशें लवलाहीं । मग हृदयीं कां न उपजे? ॥ १०२ ॥ कर्मी पंचाग्निभावना । कीं उपास्तींत दक्षिणनेत्रस्थ-पुरुषभावना । योगामार्गी चक्रभावना । अस्तिभावें सांगे श्रुति ॥ १०३ ॥ जें अस्तित्वभावें तीव्र होय । ते भावना कळतां मृदुत्व लाहे । म्हणोनी अस्तिभावेंचि आहे । कुंडलिन्यादि उपदेश ॥ १०४ ॥ परी यावें भावनापण । तें लिहिलें कळाया वेदान्तज्ञान । आघवेंचि जगत् भावना म्हणोन । शिष्य असतां साधनसंपन्न संभवे बोधू ॥ १०५ ॥ परी नवल कलिजनांचें पिसें । सत्सेवा न करवे देहलालसे । पुस्तकें संग्रहोनी विशेषें । वेदान्त वाचती अधिकारेंविण ॥ १०६ ॥ पूर्वींची तीव्र सगुणोपासना । ती वाचनेंचि होय मृदुभावना । न सुटे भोगतां विषयवासना । तेणें हानि जाणा दोन्हींकडे ॥ १०७ ॥ सगुण तुच्छ झालें ज्ञानें । निर्गुण हारपलें संशयानें । तें रीति या चित्तीं जाहलें ठाणें । विषयाचें वा झोपेचें ॥ १०८ ॥ यालागीं एवढें करावें । भगवद्गुणशास्त्र ऐकावें । रागद्वेष आघवे टाकावे । सत्संगीं असावें सर्वदा ॥ १०९ ॥ सत्संगाविण शास्त्रवचन । करितां तरी उठे अवगुण । पूर्वींची एकादी वृत्ति जाण । प्रिय असतां तेचि दृढ होय ॥ ११० ॥ व्यवहारन्याय पुस्तकें पाहुनी । वर्तले असते चाकर जनीं । तरी निरीक्षक अधिकारी तया स्थानीं । नेमिले असते कासया? ॥ १११ ॥

[1] विद्वान लोक.

आपुल्यास आवडे तैसेचि श्लोक । चित्त शोधुनि काढी देख । यालागीं सत्संगाविण सम्यक् । शास्त्र वाचणें महागर्तु[1] ॥ ११२ ॥ म्हणोनी अद्वैत ज्ञानाविण । सर्वथा न मानावें गुरूचें वचन । ज्ञान तंव होय विचारें करून । परी तेथहि गुरुवचन स्थायित्वानुमोदक[2] ॥ ११३ ॥ हेंचि विद्यारण्य ध्यानदीपीं म्हणती । तें संस्कृतशास्त्रीं पहावें त्या ग्रंथीं । मानसपूजारहस्यरीति । निरोपिली येथ ॥ ११४ ॥ विशेष प्रकार कळेल पुढें । ऐसेनि पुनरुक्ति जरी घडे । हो कां अमृत वारंवार पितां फुडें । मरण जोडे कवणातें ॥ ११५ ॥ जेविलेंचि जेवितां । कीं योनि भोगिलीचि भोगितां । लाज न वाटे सर्वथा चित्ता । उपदेशा पुनरुक्तता कां म्हणणें ? ॥ ११६ ॥ असो आळंदीश्वरचरणीं । कविताकमळमाळ अर्पुनी । श्रीज्ञानराज माउली हा मंत्र वाणी । जपत भजनीं नांदूं सुखे ॥ ११७ ॥

हरिः ॐ तत्सत् श्रीज्ञानेश्वरकृपाप्रसादे गद्यपद्यान्विते संप्रदायसुरतरौ पूर्वविहारे भागवतधर्मनिर्भयत्वकथनपूर्वक बाह्यमानससेवारहस्यादिनिर्णयो नाम सप्तदशमं कुसुमम् ॥ १७ ॥



## अभंग

**जंव पोटीं नाहीं शुद्ध कळवळा । तंव या गोपाळा नावडे कीं ॥१॥**
**अनुभवावीण उगें शब्दज्ञान । तेथें भगवान नाहीं नाहीं ॥ २ ॥**
**शरीरीं रोमांच डोळां अश्रुधारा । न सोडी उदारा क्षणभरीं ॥३॥**
**तेचि माय व्याली सुकृताचें फळ । झालें कोटिकुळ हरिरूप ॥४॥**
**देव आहे नाहीं तोंवरीच तर्क । हृदयीं प्रेमार्क जंव नाहीं ॥ ५ ॥**
**हरिगुण गातां नेत्रीं एक वेळ । प्रेममय जळ आलें जरी ॥ ६ ॥**
**तरी मग शब्द विलयास जाती । ज्ञानेश्वरमूर्ति प्रगटतां ॥ ७ ॥**

( श्रीगुलाबरावमहाराजकृत )

---

१ मोठा खड्डाच होय. २ ज्ञान स्थिर होण्यास गुरूंचा होकार अवश्य.



|| श्रीज्ञानेश्वरमाउली समर्थ ||

# अध्याय १८ वा,

# स्वेष्ट-हरिहरोपासना

जय जय सद्गुरु मनमोहना । जय जय सद्गुरु भक्तभूषणा । जय जय सद्गुरु कल्याणनिधाना । आळंदीपते ॥ १ ॥ जय जय सद्गुरो पूर्णचंद्रा । जय जय सद्गुरो विमुक्ततंद्रा । जय जय सद्गुरो सर्वेश्वरा । आळंदीपते ॥२॥ तुझेनि नामें लब्धस्फूर्ति । काव्यमयचि होय क्षिति । यालागीं सावध श्रोतीं । श्रवणार्थी असावें ॥ ३ ॥ मागां बोलिलें निरूपण । तें ऐकोनी शिष्य करी प्रश्न । श्रीगुरूतें विनवून । म्हणे कवण उपासन संप्रदायीं ॥ ४ ॥ पंचायतनोपास्ति । स्मार्तां[1] बोलिली निरुतीं । संप्रदायीं कवणे रीति । कृपा करोनि मज सांगा ॥ ५ ॥ श्रीगुरु म्हणती ऐक उत्तर । निर्णय पाहतां साचार । मज आवडती हरिहर । तेचि उपास्य संप्रदायीं ॥ ६ ॥ हरिहरमयकृष्णमूर्ति । किंवा आळंदीपती । संप्रदायीं उपास्य होती । परी आनोपास्तिहि अविरुद्ध[2] ॥ ७ ॥ आधीं कोणत्याहि मूर्ति । ईश्वरोपास्य सर्वोप्रति । जीवोपास्य नाहींच निश्चितीं । हा वेदान्तीं निर्णयो ॥ ८ ॥ ईश्वर पुल्लिंगी शब्द । तो विष्णुशिवादिवाच्य प्रसिद्ध । चिति[3] स्त्रीलिंगी शब्द । राधाउमादिदेवीवाच्य ॥ ९ ॥ मायोपाहित चेतन । साक्षाद् भक्तानुग्रहाकारण । तें पुरुषरूपें देव आपण । देवी जाण स्त्रीरूपें ॥ १० ॥

---

१ स्मृतींत सांगितलेली. २ दुसऱ्याही उपासना गैर नाहींत. ३ चैतन्य अशा अर्थी.

परी देव्युपासनेंत वाममार्ग । तो बहुधा नाहीं सात्विक प्रसंग । जो कीं असे दक्षिण मार्ग । तो अनुकूल सात्विकां ॥ ११ ॥ देवी गणेश सूर्य शिव । आणि परमात्मा वासुदेव । हे पांचहि उपास्य, तदपि शिव । कृष्णोपास्य संमत मातें ॥ १२ ॥ राधा उमा रमा गंगा । याहि येती उपास्त्विचौरंगा । तथापि सर्व संबंधाभंगा । कवण अनुरागावें निरखू ॥ १३ ॥ एकापासोनि एका उत्पत्ति । हे आघवीच कल्पभेदाची रीति । जैसे धान्यमापीं दाणे तेचि येती । परी क्रम निश्चितीं वेगळा त्यांचा ॥ १४ ॥ कोणे कल्पीं देवीपासोन । ब्रह्मा हरि हर समुत्पन्न । केव्हां ब्रह्मा हरि शिवापासोन । केव्हां हरीपासोन शिवब्रह्मा ॥ १५ ॥ केव्हां शिवापासोन देव्युत्पत्ति । केव्हां हरीपासोन देव्युत्पत्ति । केव्हां गणेशापासोन अवघे होती । गणेशोत्पत्ति केव्हां तैसी ॥ १६ ॥ पुढें याचा विशेष विचार । परी उपास्य होती समग्र । तथापि कांहीं प्रकार । पुराणवाक्यें कळों ये ॥ १७ ॥ गणेशोपासना उपपुराणीं । तैसी न वर्णिली महापुराणीं । महापुराणमूलीय उपपुराणीं । प्रमाणता[1] असे ॥ १८ ॥ ब्रह्मवैवर्त महापुराण । तेथ गणेशखंडीं गणेशोपासन । बोलिलें परी कृष्णचि उमेस वर देऊन । गणेश जाहला ही कथा तेथें ॥ १९ ॥ अष्टमाध्यायीं ब्रह्मवैवर्ती । गणेशखंडा कथा पहावी श्रोतीं । आत्मा वै पुत्र या श्रुतीं । शिवहि गणेश ॥ २० ॥ म्हणोनि महापुराणें पहातां । गणेश शिव वा कृष्णचि तत्वतां । परी शिवकृष्णोपासना करितां । गणेशोपासना त्यांत अंतर्भवे ॥ २१ ॥ (चूर्णिका) गणेशमौद्गलीं ईश्वरत्वेंकरून । निरोपिलें आहे उपासन । तें तंव अतियोग्य संपूर्ण । परी अवलोकितां महापुराण । मूर्तित्वें गणेश शिव वा कृष्ण । वास्तव गणेशोपासना अंतर्भाव करून । उपास्य शिवकृष्ण मत माझें ॥ २२ ॥ आतां सूर्योपास्ति सांबपुराणीं । ते ईश्वररूपत्वेंकरोनि । मान्य आहे मजलागुनि । परी मूर्तित्वें महापुराणीं विचार करूं ॥ २३ ॥ सूर्यंस्थीं विष्णुशक्ति । ऐसी विष्णुपुराणोक्ति । द्वितीयांशीं एकादशाध्यायीं श्रोतीं ।

[1] महापुराणांत आधार असला तर उपपुराणास प्रमाण म्हणावें.

अवलोकावी ॥२४॥ सुवर्ण केश, सुवर्ण शरीर। सुवर्ण श्मश्रु, पुरुष सुंदर। आदित्यमंडळीं परिकर। दिसतु आहे ॥ २५ ॥ तो शिवाचि ऐसें अपय्यादीक्षित। म्हणती शिवार्कमणिदीपिकेंत। आतां विष्णूचि असे सूर्यमंडळांत। ऐसी हरिस्मृति ॥ २६ ॥

ध्येयः सदा सवितृमंडलमध्यवर्ती।
नारायणः सरसिजासनसंनिविष्टः॥
केयूरवान् मकरकुंडलवान् किरीटी।
हारी हिरण्मयवपुर्धृतशंखचक्रः॥ १ ॥

श्रीभागवतीं एकादशस्कंधीं। सत्ताविसाविया अध्यायाच्या आधीं। पूजाप्रकार उद्धवा बोधी। कृपानिधि श्रीकृष्ण ॥२७॥ तेथ सांगितले मूर्त्याधार[1]। त्यांत एक सूर्यचक्र। स्वयें बोले शार्ङ्गधर। कीं मज पूजावें रविचक्रींहि ॥२८॥ जरी बोलिलें सांबपुराणीं। ब्रह्माहरिहररूपें दिनमणी[2]। परी ते ईश्वरत्वेंकरूनी। मूर्तित्वें करोनि शिव विष्णु सूर्य ॥ २९ ॥ ईश्वरत्वें पाहतां। स्वंभहि ब्रह्माहरिहर तत्वतां। परी मूर्तित्वें तत्वतां। सूर्यमंडळीं ॥ ३० ॥ हिरण्मयवपू शंखचक्रधारी। नारायण कमलासनावरी। रविमंडळीं सर्वदा निर्धारीं। ध्यानीं आणिजे ॥ ३१ ॥ हीं मूर्तीचीं विशेषणें संपूर्ण। सूर्यमंडळीं उपदेशी[3] वचन। यद्यपि ब्रह्मा विष्णु शिव प्रकाशमान। म्हणोनी सूर्यरूप होतील ते ॥३२॥ तथापि वन्हिहि प्रकाशमान। तयाच्या अन्वयें प्रकाश पूर्ण। आणि कोटिचंद्र सुशीतल म्हणोन। वर्णनहि असे शिवविष्णूचें ॥ ३३ ॥ वेदीं सूर्यासचि विष्णू म्हणती। ऐसी शंका न घ्यावी पुढती। गोपालतापनीयादि श्रुति। विष्णुमूर्तिविषयीं प्रमाण ॥ ३४ ॥ मूर्तित्वें पाहतां विष्णुशिव। म्हणोनि सूर्योपासनेचाहि अंतर्भाव। हरिहरोपास्तींत होय सर्व। यास्तव धरावा भाव तेथ मी म्हणे ॥ ३५ ॥ आतां देव्युपासना करणें। तें

१ ज्या ज्या ठिकाणीं मूर्तीची कल्पना करावयाची तीं स्थानें. २ सूर्य. ३ उपदेश करतें, सांगतें.

खरी आलें योग्यपणें । तथापि सर्व संबंध खुणे । न पवे तेहि[1] ॥ ३६ ॥ गणेशाचे ठायीं लालन । परी वात्सल्य न घडे उमेविण । माधुर्याविषयीं प्रमाण । उपलब्ध नाहीं[2] ॥३७॥ सूर्योपासनेंत पाहतां । तैसें लालनचि होय तत्वतां । वात्सल्यमाधुर्यवार्ता । तेथहि सर्वथा अप्रसिद्ध ॥ ३८ ॥ देवीच्या ठायीं लालन । घडे केवल मातृभावनेंकरून । परी वात्सल्य माधुर्य जाण । न घडती तेथें ॥ ३९ ॥ म्हणोनी गणेशसूर्योपासन । शिवविष्णूपासनेंत अंतर्भाव करून । देवीवरी मातृभावना करून । करावें लालन तेथ सुखें ॥ ४० ॥ देवीवरी माधुर्य करितां । तरी पत्नी मानावें लागेल तत्वता । पत्नीभजनें पति तरतां । नाहीं आख्यायिका वेदपुराणीं ॥ ४१ ॥ यालागीं माधुर्यसंबंध ठेवणें । तो न घडे पुरुषाविणें । म्हणोनी पुरुषोपासनाचि[3] मानणें । संप्रदायीं माझ्या ॥ ४२ ॥ आतां देवीचे ठायीं लालन । तें करावें उमा गंगा वा राधा रुक्मिणी स्मरोन । वादी म्हणे तिन्ही काळीं सेवावा कृष्ण । हें पूर्वीं विधान बोलिलां तुम्ही ॥ ४३ ॥ आतां सांगतां लालन । देवीचे ठायीं करावें संपूर्ण । सिद्धान्ती म्हणे सावधान । ययाचें उत्तर ऐक पां ॥ ४४ ॥ स्त्री म्हणोनी मोह कांहीं । ईश्वराच्या ठायीं नाहीं । माता असतां पाळिल लवलाही । आणि पिता पुरुषत्वें उपेक्षिल ॥ ४५ ॥ ईश्वर दयाळु सर्वथा । निज भक्तासी मातापिता । मी या जगताचा पिता । मी माता धाता हें गीतावचन ॥ ४६ ॥ "कृष्णस्तु कालिका साक्षात् रामस्त्रिपुरसुंदरी" । हें तंत्रवाक्य तदर्थ ऐकावें कुसरी । श्रीकृष्णींही मातृभावना निर्धारीं । लालनीं साजरी घडों शके ॥ ४७ किंवा राधादी मातृभावना । लालनीं करावी आवडल्या मना । तंव वादी म्हणे माधुर्य राजस जाणा । वाटे मातें ॥ ४८ ॥ सिद्धान्ती म्हणे कोणता गुण । उठेल कोणत्या गुणापासोन । हें एक जाणे नारायण । यालागीं चलावें तदुक्त मार्गें ॥ ४९ ॥ परी लालनीं स्वसंकटीं । भगवंत रक्षील ही आशा पोटीं ।

---

१ उपासनेचे सर्व प्रकार तेथें जमत नाहींत. २ पति समजून गणेशाची भक्ति कोणी केलेली नाहीं. ३ रामकृष्णादि देवांचीच, देवीची नव्हे.

आणि वात्सल्यामार्जी गोमटी । तीव्र प्रतीति विश्वासा ॥ ५० ॥ केवळ आत्मनिवेदन । तेथ तंव न राहे विशेषपण । परी माधुर्यभक्तींत आत्मनिवेदन । दास्य आणि माधुर्येंहि घडे ॥ ५१ ॥ आतां स्वभिन्न भावचि जंव नाहीं । परी माधुर्य घडे कृष्णाचेचि ठायीं । यालागीं शिव-शेषशाई । उपास्य माझे ॥ ५२ ॥ इतर उपासना जे करिती । त्यांचा द्वेष न धरूं चित्तीं । परी वैकुंठ-पति कैलासपति । उपास्य मज ॥ ५३ ॥ माझे उमा माता, पिता शिव । आचार्य श्रीज्ञानदेव । पति प्रत्यक्ष वासुदेव । बहिणी राधिकादि गोपी ॥५४॥ हेंचि माझें पंचायतन । मुख्य भजावा जगज्जीवन । यथार्थ भक्तीची खूण । शिवापासोन प्रगटली ॥ ५५ ॥ मग ते परंपरा येतां । तातप्रसाद मज मिळतां । कांहीं विकार नाणितां । भक्षावा सुखें ॥ ५६ ॥ तंव शिष्य म्हणे शिवशेषशाई । उपास्य होवावया कारण कायी ? । केवळ शिव वा शेषशाई । उपास्य कां नव्हे ? ॥ ५७ ॥ आणि देवीस पत्नी भावितां । आपण पतन बोलिलें तत्वतां । परी प्रल्हादें लक्ष्मीस भाविली पत्नीवा । ऐसी कथा वासिष्ठीं ॥ ५८ ॥ श्रीगुरु म्हणती सावधान । ऐक शंकासमाधान । उपास्य एक ईश्वरत्वें करून । आणि शिवविष्णु तंव अभिन्न सर्वभावें ॥ ५९ ॥ ईश्वरत्वें शिवविष्णु एक । येथ प्रमाणें असती अनेक । अंतःकरणें शिवविष्णु एक । हेंहि प्रमाणें असती पैं ॥ ६० ॥ शिव जाहले विष्णुयुवती । ऐशा असती श्रुतिस्मृति । आणि विष्णु जाहले शिवयुवती । ऐशींहि असतीं प्रमाणें ॥६१॥ म्हणोनी शिवविष्णूची समता बहुत । निरूपिली असे अखंडित । असे मूर्तित्वें एकता निश्चित । बोलिली आहे स्मृतींत तेंहि ऐकें ॥ ६२ ॥

रुद्रो नारायणश्चैवेत्येकं सत्त्वं द्विधा कृतम् ।
लोके चरति कौंतेय व्यक्तिस्थं सर्वकर्मसु ॥

याचा अर्थ स्पष्टचि जाण । तंव वादी म्हणे दुसरें वचन । " एकोऽहं पंचधा जातः " हें प्रमाण । अभिन्नपंचायतनोपास्तीविषयीं[1] ॥ ६३ ॥ सिद्धान्ती म्हणे

[1] पांचही उपास्यदेवता एकस्वरूपच आहेत, याविषयीं.

हें वचन । दावी ईश्वरता अभिन्न । परी रुद्र नारायण । मूर्तित्वें अभिन्न असती पैं ॥ ६४ ॥ शिवाचा श्वेतवर्ण । स्वयें सांगे स्कंदपुराण । शिवाचाचि श्यामवर्ण । ब्रह्मांडपुराण स्वयें सांगे ॥ ६५ ॥ विष्णूचाहि शुक्लवर्ण । " तत्र नारायणं देवं शुक्लवर्णं चतुर्भुजम् " इत्यादि सांगती वचन । आणि कृतयुगीं हरीचें शुक्लध्यान । हें निरूपण भागवतीं एकादश स्कंधीं पंचमाध्यायीं ॥ ६६ ॥ गंगा शंकराची पत्नी । ऐसी महाभारतीं वाणी । आणि गंगा नारायणाची पत्नी । हे ब्रह्मवैवर्तपुराणीं प्रकृतिखंडीं द्वादशाध्यायीं ॥ ६७ ॥ म्हणवूनहि पाहतां । शिवविष्णुमूर्तींची ऐक्यता । किंवा ऐक्यत्वें सति[1] भिन्नता । शिवविष्णुमूर्तींची ॥ ६८ ॥ त्रिनेत्र चतुर्बाह्वादि चिन्ह । दोघांमध्यें भिन्न । नीलशुक्लत्वादि चिन्ह । समसमान दोघांत ॥ ६९ ॥ ऐसें बोलिले तुकाराम । कीं शिव आणि पुरुषोत्तम । जेवि कां अंग सव्य-वाम[2] । तैसें परम अभिन्न ते ॥ ७० ॥ सूर्य-गणेशादिकांच्या मूर्ति । ईश्वरत्वें एक, मूर्तित्वें भिन्न असती । वैकुंठपति आणि कैलासपति । ईशत्वें एक, मूर्तित्वें अभिन्न ॥ ७१ ॥ आदित्यजीवता वारोनी । ईश्वर उपास्य स्थापिला ब्रह्मसूत्रांनीं । तैसी शिवविष्णुजीवता वारोनी । ईश्वर उपास्य स्थापिला नाहीं ॥ ७२ ॥ म्हणाल तेव्हां नव्हती शिवविष्णुमूर्ति । तरी लोपाव्या लागतील तलवकार नृसिंहतापनीयादि श्रुति । परी भाष्य आहे तयांवरती । भगवत्पूज्यपादकृत[3] ॥ ७३ ॥ यद्यपि शक्ति आणि गणपति । यांचेंहि जीवत्व निराकरोनी न स्थापिली उपास्ति । तथापि मूर्तित्वें भेदप्रतीति । बोलिली कीरू ॥ ७४ ॥ किंवा सत्वरजस्तमोगुण । यांचे उपाहित विधि हरि त्रिनयन । गणपति मूर्ति गुणांतगुण । कीं चतुर्थ मूर्ति म्हणावी ? ॥ ७५ ॥ चतुर्थ मूर्ति म्हणतां । तरी तिजाविषयीं वाद वरवतां । शैववैष्णवादिकांच्या मता । पाहतां शिवविष्णूच्या चतुर्थ मूर्ति ॥ ७६ ॥ चतुर्थ मूर्ति आहे कीं नाहीं । हे उद्घाटिजेल[4] मूर्तिनिर्णयीं । गणपति चतुर्थ मूर्ति असतां

---

१ ऐक्य असून. २ डावें उजवें. ३ श्रीमत् शंकराचार्यकृत, ४ विचार होईल.

जरीहि । तरी कृष्ण गणपति झाला ही कथा नसती ब्रह्मवैवर्ती ॥७७॥ विठ्ठल गणपति दुजा नाहीं । तुकाराम बोलिले ईश्वरत्वें एकताहि । मूर्तित्वें भेद बोलिला ठायीं । गणोबा तो विक्राळ लाडूमोदकांचा काळ म्हणोनी ॥ ७८ ॥ ईश्वरत्वें उपास्यता । रुचि तेथ फल वत्वतां । परी मूर्त्युत्कर्षे पाहतां । उपास्यता हरिहरां ॥ ७९ ॥ केवळ ईश्वरोत्कर्ष करोन । उपासनीं श्रद्धा पाहिजे गहन । आणि दोन्ही उत्कर्षाचें अधिष्ठान । तेथ श्रद्धेविण करतां स्मरण, फळ पावे ॥८०॥ आतां आरंभीं गणेश पुजावा । तेणेंचि निरसे विघ्नगोवा । परी तेथहि ईश्वरत्वेंचि पुजावा । हा विधि असे ॥ ८१ ॥ किंवा कीर्तिमुखाच्या पूजेविण । पूजा न घे उमारमण । कीं पार्षदांसी तीर्थ न देतां जाण । विष्णुतीर्थग्रहण अन्यायू ॥ ८२ ॥ तेविं शिववरें करोनी निश्चिती । आधीं गणेश पूजितां विघ्ननाश होती । ऐशाहि कथा असती । म्हणोनी निर्विघ्न भक्तीस्तव प्रार्थी गणेशा मी ॥ ८३ ॥ तंव वादी म्हणे गणेशभेद । मूर्तित्वें असो कां प्रसिद्ध । परी शक्तीचा तंव अभेद । मूर्तित्वें आहे ॥ ८४ ॥ तीन गुणांच्या तीन शक्ति । काली लक्ष्मी सरस्वती । एकाचि द्विधा झाली मूर्ति । राधाकृष्ण, ही ब्रह्मवैवर्ती कथा ॥ ८५॥ तैं सिद्धान्ती म्हणे ऐक वचन । मी बंधुत्वें उपासीं गजानन । आणि मातृत्वें शक्त्युपासन । इष्ट आहे मजलागीं ॥ ८६ ॥ परी माधुर्यादि भाव । तेथ न होती स्वयमेव । जयासी रुचिकर माधुर्य ठेव । तयासी त्यागावी लागेल उपासना ॥८७॥ जरी अन्नं ब्रह्मात्युपासित्व[1] । त्यागावया सांगे श्रुति[1] । तरी तेथ अन्नादि मूर्ति । भौतिक सिद्ध ॥ ८८ ॥ अभौतिकोपहितोपास्ति[2] त्यजितां । दोष शास्त्र सांगे सर्वथा । यास्तव जेथ सर्व संबंध येती भावितां । त्या शिवा आणि अनंता चिंतावें ॥ ८९ ॥ केवळ लालनीं रुचि ज्यांसी । तींहीं आराधावें शक्तिसी । तंव वादी म्हणे मातृभावना बोलिली पुरुषीं । तैसी पतिभावना शक्तीविषयीं कां न घडे ? ॥ ९० ॥ तेव्हां

१ अन्न ब्रह्म असलें तरी अन्नाची उपासना करूं नये. २ अन्नाच्या ठिकाणीं जें ब्रह्म आहे त्याची उपासना.

म्हणे सिद्धान्ती । घडेल तेणें करावी तैसी उपास्ति । अलौकिक जरी उपास्य-स्थिति । तरी किंचिल्लौकिकसादृश्य वांछी भावना ॥ ९१ ॥ पालनगुणविशिष्ट पुरुष पिता । पालनाविशिष्टचि वनिता माता । एवं सदृश गुणोपसंहारें मातृता । पुरुषीं तत्वतां बोलिली मीं ॥ ९२ ॥ मीं माता हें गीतेंत वचन । तैसें स्त्रियेसी पतिभावन । येथ उपसंहारीं नाहीं सदृश गुण । आणि नाहीं वचन-उपलब्धि ॥ ९३ ॥ जरी प्रेमगुणविशिष्ट पुरुष पति । प्रेमगुणविशिष्ट स्त्री युवती । तरी यांत एक भाव उपासकाप्रति । यास्तव सम उपास्यप्रतीति शंका न करी ॥९४॥ तंव वादी म्हणे देवीस पत्नी । मानोनी माधुर्य करावें मनीं । प्रऱ्हादें भाविली लक्ष्मी पत्नी। वासिष्ठीं उपशमप्रकरणीं ही कथा ॥९५

चलच्छशिकलापूरचारुचामरधारिणी ॥
इयं मे पार्षगा लक्ष्मीः क्षीरोदकुहरोत्थिता ॥ ४५ ॥
( वासिष्ठ, उपशम प्र०, अ० ३१ )

याचा पदशः अर्थ पूर्ण । संस्कृतवेत्त्यां कळे संपूर्ण । मीं भावार्थ जाणिला संस्कृताविण । कीं प्रऱ्हादें लक्ष्मीस भाविलें पत्नी ॥ ९६ ॥ सिद्धान्ती म्हणे पुसिलें बरवें । त्वां ग्रंथ बहुत वाचले नवे । परी पुढील श्लोक प्रमाण देसी स्वभावें । मागील श्लोक न जाणुनी ॥ ९७ ॥ येचि अध्यायीं चाळिसावा श्लोक । कीं प्रऱ्हाद आपणा भावी वैकुंठनायक । म्हणोनी लक्ष्मीस सम्यक् । भाविलें पत्नी ॥ ९८ ॥

अविष्णुः पूजयन्विष्णुं न पूजाफलभाक् भवेत् ।
विष्णुर्भूत्वा यजेद्विष्णुमयं विष्णुरहं स्थितः ॥ ४० ॥

याचाहि अर्थ संस्कृतज्ञ जाणती । मज कळला भावार्थ तो येणें रीतीं । कीं विष्णु होवोनि पुजावें विष्णुप्रति । तो विष्णु निश्चितीं मीचि आहें ॥९९॥ त्वां दिधला जो श्लोक प्रमाण । त्या श्लोकाच्या पुढें दुसरें वचन । एकुसष्टाव्या श्लोकीं जाऊं दे लोचन । तेथ स्वमिन्[1] विष्णुत्वभावन[1] प्रऱ्हादाचें ॥१००॥

१ आपले ठिकाणीं विष्णुत्व मानणें.

अयं नीलोत्पलश्यामः पीतवासो गदाधरः ।
लक्ष्मीमाम् गरुडारूढः स्वयमेवाहमच्युतः ॥ ६१ ॥

( वासिष्ठ उपशम, प्र०, अ० ३१ )

नीलकमलसम श्यामवर्ण । गदाधारी पीतवसन । लक्ष्मीसहित गरुडासन । मी नारायण, प्रल्हाद म्हणे ॥१०१॥ येथ आत्मत्वें केली विष्णुभक्ति । यालागीं लक्ष्मी भाविली युवती । करोनिया देवीभक्ति । न बोलिली देवीवरुती पत्नीत्व-भावना ॥ १०२ ॥ पत्नीत्वभावना स्वभोगासाठीं । म्हणोनि ते न ये भक्तिपरिपाटी[1] । पतित्व भावनेचिया पोटीं । भोक्ता ईश्वर, आपण भोग्य ॥ १०३ ॥ भर्ता भोक्ता महेश्वर इति । "निर्गुणं गुणभोक्तृ च" पुढती । स्वयें बोलिली जागृच्छ्रुति[2] । म्हणोनि अविरुद्ध भगवंतीं पतिभाव ॥१०४॥ यद्यपि देवीस पत्नीत्वभावना । दाविती सुरसुंदर्याद्युपासना । तरी त्या वर्धक रजोगुणा । देवोनि इह भोगदाना, नरकीं नेती ॥ १०५ ॥ यक्षिणी न येतां धांवून । तिचें क्रोधमुद्रेनें करावें आकर्षण । तदा न येतां कपाळ दुखे दारुण । मग पावोनी मरण महानरकीं जाय ॥ १०६ ॥ इत्यादि मंत्रशास्त्रीं विधि । तेथ वादीनें पाठवावी बुद्धि । यक्षास राजस भजती हें कृपानिधि । व्रजवर[3] बोलिले गीतेंत ॥ १०७ ॥ तंव वादी म्हणे बाह्य प्रतिमासेवा । तीहि राजस हा तंत्रठेवा[4] । तो श्लोक ऐकावा । प्रमाण मी सांगें ॥ १०८ ॥

उपासना द्विधा प्रोक्ता श्रेष्ठा तत्र तु सात्त्विकी ।
यस्यां च मानसीपूजाजपौ मुख्यतमौ स्मृतौ ॥
राजसो दाक्षिणो मार्गः प्रतिमायां च पूजनम् ॥
बाह्योपचारैः पुष्पाद्यैस्तदा ध्यानं विशिष्यते ।

( मेरुतंत्रप्रकाश १ )

जपपूजा मानसिक । या नांव उपासना सात्विक । आणि बाह्योपचारें पूजणें प्रतिमा सम्यक् । राजस सेवा या नांव ॥ १०९ ॥ तें सिद्धान्ती म्हणे भज-

१ भक्तीच्या मार्गांत. २ भगवद्गीता. ३ श्रीकृष्ण. ४ तंत्रांतील विचार.

प्रति । माहित नव्हतें तव तांत्रिक मति । आतां ऐके सात्वत श्रुति । एकादश स्कंधीं बोलिली जे ॥ ११० ॥

कैवल्यं सात्विकं ज्ञानं रजो वैकल्पिकं च यत् ।
प्राकृतं तामसं ज्ञानं मन्निष्ठं निर्गुणं स्मृतम् ॥ २४ ॥
वनं तु सात्विको वासो ग्रामो राजस उच्यते
तामसं द्यूतसदनं मन्निकेतं तु निर्गुणम् ॥ २५ ॥
सात्विक्याध्यात्मिकी श्रद्धा कर्मश्रद्धा तु राजसी
तामस्यधर्मे या श्रद्धा मत्सेवायां तु निर्गुणा ॥ २६ ॥

( भागवत स्कंध १२, अ० २५ )

या सर्व श्लोकांचा अभिप्राय पूर्ण । कीं भगवत्सेवा श्रेष्ठ ब्रह्मज्ञानाहून । म्हणोनिच ती निर्गुण । यांत स्थूल देवालय निर्गुण बोलिलें आहे ॥ १११ ॥ जरी स्थूल देवालया निर्गुणता । तरी बाह्योपचारा केवि रजोगुणता । पुराण-विरोधी प्रमाणता[1] । मेरुतंत्रास नाहीं ॥ ११२॥ अथवा देवीची बाह्य पूजा जाण । तेथें असो का रजोगुण । कारण देवीपूजेचेंचि प्रकरण । चाललें म्हणोनि ॥ ११३ ॥ दक्षिण मार्ग तो राजस । हा देव्यागमाचाचि विशेष । वाम मार्ग तो तामस । मेरुतंत्रींच बोलिला ॥ ११४ ॥

तामसोपासनं प्रोक्तं पीठादौ बलिदानतः ।
वाममार्गे न तत्रेति तत्रस्थ वचनं स्मर ॥

देवीची मानस पूजा सात्विक । देवीची बाह्य पूजा रजात्मक । देवीची चक्रपूजा सकाळिक । तामस, हे श्लोक बोलती ॥ ११५॥ विष्णूची बाह्य पूजाहि निर्गुण । ये विषयीं सांगितलें भागवत प्रमाण । शिवाचीहि पूजा निर्गुण । एतदर्थी प्रमाण सूतसंहितादि ॥ ११६ ॥ या वचनें पाहतां । शिवविष्णूंचि ऐक्य तत्वतां । शक्तीस मायाप्राधान्यें त्रिगुणता । ब्रह्मप्राधान्यें निर्गुणता शिव-विष्णु पुरुषां ॥ ११७ ॥ यद्यपि पुं स्त्री नपुंसक लिंग शब्द । ब्रह्मवाचक

१ पुराणास विरोध असल्यावर मेरुतंत्र प्रमाण होत नाहीं.

असती प्रसिद्ध । तथापि आग्रहीयासी विशद । आग्रहेंचि विवेक सांगूं ॥ ११८ ॥ बहुशः सद्वाचक नपुंसक शब्द । बहुशः चिद्वाचक स्त्रीलिंग शब्द । आनंदवाचक पुल्लिंग शब्द । बहुशब्दान्वयें अल्पशब्दार्थसमन्वयें ॥ ११९ ॥ यद्यपि शांति तृप्ति । इत्यादि आनंदवाचक स्त्री-शब्द असती । तथापि ह्या अंतःकरणाच्या वृत्ति । न बोलती आत्मानंदातें ॥ १२० ॥ अथवा आत्मानंदीं यांची लक्षणा । तरी आनंद शब्दाची शक्तिच जाणा । म्हणोनी पुल्लिंग-वाच्य ब्रह्मप्रधाना । पुरुषोपासना अतिमान्य ॥ १२१ ॥ हेंचि बोलिले एकनाथ । तो अभंग प्रमाण ऐक येथ । तेणें जाणोनी यथार्थ । संशय समस्त उच्छेदी ॥ १२२ ॥

**सत्पद तें ब्रह्म चित्पद ते माया। आनंद पदीं जया म्हणती हरी १**
**सत्पद निर्गुण चित्पद सगुण । सगुण-निर्गुण हरिपायीं ॥२॥**
**तत्सादिति ऐसें पैल वस्तूवरि । गीतेमाजीं हरि बोलियेले ॥३॥**
**हरिपदप्राप्ति भोळ्या भाविकासी । अभिमानियासी गर्भवास ॥४॥**
**अस्ति भाति प्रिय ऐसीं पदें तिन्हीं। एकाजनार्दनीं तेचि झाले ॥५॥**

सत्पद तें निर्गुण । याचें केवळ नाहींच उपासन । चित्पद तें सगुण । माया म्हणोन देव्युपासित ॥ १२३ ॥ आनंद तो पुरुष प्रधान । यासचि म्हणती हरि त्रिनयन । स्पष्ट असे अर्थ आन । तंव वादी आपण बोलतु ॥ १२४ ॥ मज आशंका आली भलती । कीं एकनाथ होते मानभावमती । मानभावांच्या लक्षणस्थल महावाक्यप्रकरण ग्रंथीं[1] । ही रीति बोलिली ही ऐका ॥ १२५ ॥ " तच्छब्दें :ब्रह्म बोलिजे । चिच्छब्दें माया बोलिजे । आनंद शब्दें ईश्वर बोलिजे । ब्रह्म माया ईश्वर ऐसा त्रयांच परमेश्वर एक आत[2] " ॥ १ ॥

---

१ हें वचन मानभावांचा लक्षणस्थल म्हणून प्रकरणात्मक जो ग्रंथ आहे त्यांतील महावाक्यप्रकरणांत आहे. २ आत म्हणजे आहे. बाकीचा अर्थ स्पष्ट आहे.

तैं सिद्धान्ती म्हणे ऐक मात । विरोध आहे मानभावमतांत[1] । महावाक्य-प्रकरणीं ब्रह्म बोलिलें सत् । आणि त्याचाचि विचार 'स्थलग्रंथ' आन सांगे ॥ ॥१२६॥ " ब्रह्म आस्त नास्त ऐसियास विषयो नव्हे " । हें विचारस्थळीं[2] वचन त्वां पहावें । एकनाथ तंव स्वभावें । मानभाव नव्हते ॥ १२७ ॥ याचि अभंगीं अस्ति भाति प्रिय । ऐक्यत्वें बोलिलें सच्चिदानंद त्रय । मानभावमतीं तंव सच्चिदानंदत्रय । भेदें अंश बोलिले ॥ १२८ ॥ " सत् तेंचि चित् । चित् तोचि आनंद । वस्तु नोहे त्रिविध । एकपद निजानंदें " ॥ १ ॥ हें स्वात्म-सुखीं[2] वचन । नाथांचेंचि आहे म्हणोन । नव्हते मानभाव परी या अभंगीं सच्चिदानंदभेदनिरूपण । विष्णुपुरुषोपासना प्रधान बोलिले ॥ १२९ ॥ अथवा मानभाव मताचा पूर्वपक्ष करूनी । ' अस्ति भाति प्रिय ऐसी पदें तिन्हीं । एका जनार्दनीं तेचि झाले ' या वाणी । स्वसिद्धान्त निर्वाणीं बोलिला ॥ १३० ॥ असो हे नाथवाक्यसंगति । पुल्लिंगवाच्य आनंद अनध्यस्थाविवर्ती । शिव विष्णु म्हणोनी उपास्ति[3] । त्यांचीच शक्तीहूनि श्रेष्ठ ॥ १३१ ॥ किंवा मेरुतंत्रवचन । सामग्री अपेक्षेनें बाह्य पूजेस म्हणे[4] रजोगुण । फळ तंव असे समान । फलदाता भगवान् म्हणोनी ॥ १३२ ॥ ईश्वरत्वें सम पंचायतन । रुच्यनुसार करावें उपासन । मज आवडती शिव कृष्ण । तोंचि विवेचन येथें केलें ॥ १३३ ॥ तंव वादी म्हणे कवणे रीति । उपास्या दोन्ही व्यक्ति । व्यवस्था ऐक म्हणे सिद्धान्ती । यथार्थ रीति सांगेन ॥ १३४ ॥ पिता शिव पति माधव । किंवा गुरु शिव कृष्ण देव ।

१ यांचे ग्रंथ सुंदर, सकल, भेंडार वगैरे निरनिराळया चौदा लिपींत लिहिले असल्यामुळें व त्यांचा प्रसिद्ध न होऊं देण्याचा उत्तम निश्चय असल्या-मुळें, लोकांना हीं वचनें माहित नाहींत; व त्यांना विचारलें असतां ते होय म्हणणारहि नाहींत. तरी पण माझ्याप्रमाणें शोध केला असतां हीं वचनें मिळाल्यावांचून राहणार नाहींत.—ग्रंथकार.

२ या नांवाचे ग्रंथांत. ३ उपासना. ४ म्हणे यांत उपेक्षेचा अर्थ आहे.

गुरु करणें लागे सदाशिव । या तातवचनें उपास्ति घडे ॥ १३५ ॥ किंवा शिवविष्णुरूप कृष्णमूर्ति । आमंत्रणविलासींही बोलिली उपपत्ति । ती उपासावी एकाचि व्यक्ति । आवडी करोनी ॥ १३६ ॥ किंवा शिवकृष्ण श्रीगुरु । हाहि बहु ग्रथीं बोलिला विचारु । उपासावा आळंदीश्वरु । शिवकृष्णरूप ॥ १३७ ॥ अथवा पंढरीचे[1] पांडुरंग । जेणें मस्तकीं धरिलें शिवलिंग । कटीं कर विटे उभा अभंग । तो रुक्मिणीरंग भजावा ॥ १३८ ॥ तंव वादी म्हणे तुमचा कांहीं । एक निश्चय दिसत नाहीं । कवणे रीति संप्रदायीं । प्रवेशावें ? ॥ १३९ ॥ सिद्धान्ती म्हणे प्रथमपासून । उपास्ति प्रकाशावया कवण कारण? । अज्ञोनी उपास्ति करितों कवण । हें तुजकारण कां मी वदूं ? ॥ १४० ॥ शिव कृष्ण मज आवडती । हें बोलिलेंचि आहे बहुग्रंथीं । वारकरीसंप्रदाय विशेष स्वमार्गाप्रति । येचि ग्रंथीं म्हणविलें मी ॥ १४१ परी मधुराद्वैतविचार । मियां गुप्त प्रगट केला समग्र । म्हणोनीच नाममात्र । मम मार्ग भिन्न मूढ म्हणती ॥ १४२ ॥ यालागीं करोनी विचार । मन्मार्गातें इच्छी अंतर । तरी कृष्ण-कर्पूरगौर । उपासिजती ॥ १४३ ॥ शिवींहि माधुर्य कैसें घडे । हें मार्गें बोलिलें आहे रोकडें । सेवाप्रकारहि फुडे[2] । बोलिले आणि पुढेंहि बोलूं ॥ १४४ ॥ आणखी एक ऐक रीति । दोहोंतुनि ज्याच्या चित्तीं । अतिशय आवडे एक व्यक्ति । त्यानें ऐसी वृत्ति धरावी ॥ १४५ ॥ कन्या वडिलांची मर्यादा करी । स्वकांतपायीं पुष्टि भरी । तेवि मर्यादा आवडी एकावरी । करोनी पुष्टि करावी अजि प्रियचरणीं ॥ १४६ ॥ एवं शालिंका विष्णुरूप । लिंग तो कैलासभूप । ऐसाहि उपास्तिदीप । शिवेष्टभजकें उजळावा ॥ १४७ ॥ परी सोडूं नये एकमेकां । चित्तीं हा धरावा आवांका । सर्व सांडोनिया शंका । शिव-व्रजनायकां भजावें ॥ १४८ ॥ इंद्रायणी आणि भागीरथी । दोन्ही मिळाल्या एके पातीं[3] । ते निजतीर्थ आळंदी मजप्रति । वैकुंठ कैलासु ॥ १४९ ॥ तेथील ज्ञानेश्वरजननी । अखंड सद्भावें नमुनी । कविताकमळमाळ चरणीं ।

---

१ पंढरींतील. २ चांगले, नीट. ३ पात्रांत ( नदीच्या ).

प्रेमें गुंफोनी वाहिली ॥ १५० ॥

हरिः ॐ तत्सत् श्रीमत्सद्गुरु ज्ञानेश्वरकृपाप्रसादे गद्यपद्यान्विते संप्रदाय-सुरतरौ पूर्वविहारे पंचायतनोपासनासाम्येऽपि स्वेष्टहरिहरोपासनोपपादनं[1] नाम अष्टादशमं कुसुमम् ॥ १८ ॥

---

## अभंग.

न सोडितां घरधंदा ॥ उगें आळोनि गोविंदा ॥
करितां वर्णाश्रमनिंदा । केविं आनंदा पावाल ॥ १ ॥
आळसाच्यासाठीं भक्ति । गृहकामीं चित्तासक्ति ॥
वर्णाश्रमीं अनासक्ति । ऐसी उक्ति कोठें रे ॥ २ ॥
कामासाठीं ब्रह्मज्ञान । जेवासाठीं संतपण ॥
मानासाठीं नारायण । उगें वदन कूजे[2] ॥ ३ ॥
कर्म न होय म्हणूनि निंदा । चातुर्याचा गृहधंदा ॥
हें तों नावडे गोविंदा । नंदनंदा मम कांता ॥ ४ ॥
जरी तुम्हा नको कर्म । तरी सांडा देहधर्म ॥
तोडा संसाराचें वर्म । आत्माराम रामीं वहा ॥ ५ ॥
वृत्ति हरवा घेवोनि नाम । सांडा अंतरींचा काम ॥
चित्तीं धरा शुद्ध प्रेम । जा विसरून शरीर ॥ ६ ॥
आधीं जिवंताचि मरा । शत्रुमित्र सम करा ॥
मानामान मोडा थारा । द्या संसारा तिलांजुली ॥ ७ ॥
लहान्याहूनि व्हा लहान । करा जीवाजंतू नमन ॥
मग वर्णाश्रमबंधन । जाईल सोडून तें आप ॥ ८ ॥
ज्ञानेश्वरकन्या पाही । सदा सद्गुरुरूपें देही ॥
गुरु-शिष्यभांव तो ठायीं । हरिपायीं सांपडे ॥ ९ ॥

---

१ पंचायतनाची उपासना सारख्याच योग्यतेची असली तरी आमची इष्ट उपासना हरिहर हीच होय. २ गाते.



॥ श्रीज्ञानेश्वरमाउली समर्थ ॥

# अध्याय १९ वा,

# भागवतधर्माचें सर्वग्राह्यत्व



जय जय सद्गुरु पूर्णकामा । जय जय सद्गुरु मनविश्रामा । जय जय सद्‌गुरु शिष्यप्रेमा । वर्ती[1] श्रीगुरो ॥ १ ॥ जय जय सद्गुरो सच्चिदानंदा । जय जय सद्गुरो आनंदकंदा । जय जय सद्गुरो निरस्तभिदा[2] । आळंदीपते ॥ २ ॥ बैसोनिया माझ्या हृदयीं । ग्रंथ वदे श्रीगुरु आई । सावध होउनी सर्वही । परिसोत श्रोते ॥ ३ ॥ सच्छिष्य कर जोडून । सद्गुरूतें करी प्रश्न । म्हणे मागील निरूपण । ऐकोन मन निवालें ॥ ४ ॥ परि भगवद्वचनगोडी । ऐकतां तृप्ति नोहे फुडी । तयाचि निरूपणाची परवडी । ऐकावी वाटे पुढत-पुढती ॥ ५ ॥ तंव श्रीगुरु म्हणती ऐक । तुज हरिहरोपासना सांगतों आणिक । तंव वादी म्हणे माझी सकळिक । आधीं शंका निरसावी ॥ ६ ॥ संप्रदाय म्हणजे कवण वर्ण ? । वेदमार्ग असतां जाण । तयातें प्रकटावया काय कारण ?[3] । अनादि कीं सादि, कृपा करोनि सांगा ॥ ७ ॥ सिद्धान्ती म्हणे पुससी काय । वर्ण आणि संप्रदाय । शब्दार्थेंचि भिन्न होय । एक सोय तयांची ॥ ८ ॥ वर्ण[4] म्हणजे जन्मसंस्कारावच्छिन्न । किंवा कोणी म्हणती गुणकर्मभेदेंकरून । संप्रदाय गुरुपरंपरास्थान[5] । यालागीं भिन्न दोन्हीही ॥ ९ ॥ वर्णें कर्माधिकार

---

१ शिष्याच्या प्रेमाप्रमाणें वागणाऱ्या. २ निवारण केले भेदभाव ज्यानें. ३ वेदमार्ग असून संप्रदाय कशाला काढतां ? ४ ब्राह्मण-क्षत्रियादि जाती. ५ संप्रदाय गुरुपरंपरेवर अवलंबून असतो.

होय प्राप्त । संप्रदाय प्रकटे मोक्षार्थ । वर्णा गायत्रीमंत्रचि विहित । संप्रदायाभिमत इष्टदेवमंत्र ॥ १० ॥ मोक्षाधिकारी चारी वर्णी । तेथ संप्रदाय प्रवर्ते तिया स्थानीं । प्रकटावयालागुनी । हाचि हेतु ॥ ११ ॥ वेद असतां कां प्रकटणें । हा प्रश्नचि न शोभे अनुगुणें । कल्पानुसार साध्यसाधनें । प्रगटवी अवघें ॥ १२ ॥ महाभारतीं बोलिलें वचन । कीं प्रत्येक कल्पीं हरीपासोन । तें तें शास्त्र संपूर्ण । त्या ऋषींनीं मिळतसे ॥ १३ ॥ श्रुति स्मृति पुराणें । न्याय मीमांसा आणि व्याख्यानें । नारायणापासोनि निर्वाणें । सकळ ऋषींतें मिळती हो ॥ १४ ॥

" युगान्तेऽतर्हितान्वेदान्सेतिहासान्महर्षयः ।
लेभिरे तपसा पूर्वमनुज्ञाताः स्वयंभुवा " ॥१॥ (अर्थ स्पष्ट)

( शांतिपर्वक्रम अ० २१०, मोक्षधर्मक्रम, अ० ३७ )

शेतीं वर्षतां पीक होये । तरी अन्यत्र वृष्टि कासया लाहे । हें पुसतांचि होय । अनर्थक जैसें ॥ १५ ॥ मेघाचा स्वभाव समग्र । सर्वत्र वर्षणें नीर । तेवीं अनादि वस्तु प्रगटणें कल्पानुसार । हें मुक्तावीण अन्यत्र दुर्निवार्य ॥ १६ ॥ म्हणोनि धर्म ईश्वरीं लीन । तो प्रगट होय कल्पानुगुण । तैसाचि भागवत संप्रदाय म्हणोन । प्रगट होय ॥ १७ ॥ अथवा भागवतसंप्रदायचि एक प्रगटता । आणि वेदधर्म जरी नसता । तरी देवाचा काळ व्यर्थ न जातां । सायास चुकता ऐसा वादीचा आशय जरी ॥ १८ ॥ तो आशयही समूळ वृथा । कांहीं श्रम न करितां । वेदपुराण भगवंता । श्वासापासोन उपजविणें ॥ १९ ॥ तेथ पुराणाचा अर्थ । मंत्र ब्राह्मण जरी विवक्षित । तरी छांदोग्य श्रुतींतील इतिहासशब्दार्थ । केला भारत आचार्यांनीं ॥ २० ॥ वादी म्हणे भविष्यही सांगे श्रुति । म्हणवोनि भारत पढलों हे संभवे नारदोक्ति । तरी व्यासगुरु नारद पुराणें सांगती । म्हणोनि तदुक्तिपाठ न घडे हें सिद्धान्ती म्हणे ॥ २१ ॥ वास्तव संहित ब्राह्मण । आणि

भारतादि इतिहास तद्विस्तर[१] पूर्ण । बृहदारण्यकभाष्यांत सांगितलें संक्षिप्त इतिहास पुराण । आणि छांदोग्यभाष्यांत विस्तृत इतिहास पुराण दर्शविलें ॥ २२ ॥ हें पुढेंहि होईल स्पष्ट । आतां वेदधर्म जरी नव्हतां प्रगट । तरी सर्वभावें भजन स्पष्ट । न होतें हरीचें ॥ २३ ॥ वैदिक कर्महीं करून अर्पण । करावेंचि पैं भगवद्भजन । एवं वैदिक धर्म भागवत संप्रदाय हे दोन । अनादिचि आथी[२] ॥ २४ ॥ तंत्रादिक प्रसिद्ध मोहनार्थ[३] । नास्तिकादि प्रसिद्ध काल्पित[४] । यालागीं वेदधर्म आणि संप्रदाय भागवत । हे दोनचि कल्याणार्थ अनादि ॥ २५ ॥ वादी म्हणे संमोहन तंत्राचें । पद्मपुराणीं नाम साचें । म्हणोनिच तयाचें । अनादित्व स्वीकृत कीं ॥ २६ ॥ सिद्धान्ती म्हणे ऐक वचन । पूर्वीं भारताचें उदाहरण । त्यांत सांख्ययोगाचेंही निरूपण । अनादित्वें बोलिलें ॥२७॥ सांख्ययोगादिक । अनादि हें सगळीक । परि आविर्भावक्रम[५] देख । कल्पीं कल्पीं वेगळा ॥२८॥ अनादि चारी युगें असती । परी तें क्रमेंचि प्रगटती । तैसें वेद भागवत प्रगटती । कृतयुगींचि ॥ २९ ॥ मग प्रगटती सांख्ययोग । तंत्रादिक प्रगटती मग । पुराणाचा तंव क्रम चांग । तैसाचि प्रगटे ॥ ३० ॥ आधीं शतकोटी एक पुराण । मग अष्टादशधा-विभागी सत्यवतीनंदन[६] । यालागीं पुराणीं तंत्राचें प्रमाण । अनादित्वेंकरून विरुद्ध नव्हे ॥ ३१ ॥ परि विशेष तंत्रप्रचार । कलींतचि असे निर्धार । भागवतधर्म तंव सुंदर । कृतयुगींही बोलिला ॥ ३२ ॥ येच विषयीं बोलिलें भारत । तेंचि ऐके सावधचित्त शांतिपर्व मोक्षधर्मांत । अष्टचत्वारिंशदधिक-त्रिशततमाध्यायीं[७] ॥ ३३ ॥

**केनैष धर्मः कथितो देवेन ऋषिणाऽपि वा ॥ ६॥**
**एकान्तीनां च का चर्या कदा चोत्पादिता विभो ।**
**एतन्मे संशयं छिंधि परं कौतूहलं हि मे ॥ ७ ॥**

---

१ भारतादि ग्रंथ ब्राह्मण ग्रंथांचाच विस्तार होत. २ आहेत. ३ मोह पाडविणारे. ४ खोटे, निराधार. ५ प्रकट होण्याची तऱ्हा. ६ व्यास. ७ अध्याय ३४८ यांत.

जनमेजय म्हणे मुनिवरा । कर्मी आणि यतीश्वरा । जे गती मिळे त्याहोनि उदारा[1] । भक्त जाती सद्गतीतें ॥ ३४ ॥ ऐसा हा भागवत धर्म । कवणें निर्मिला उत्तम । माझा संशय हा परम । कृपा करून छेदावा ॥ ३५ ॥

समूपोढेष्यनीकेषु कुरुपांडवयोर्मृधे ।
अर्जुने विमनस्के च गीता भगवता स्वयम् ॥ ८ ॥

वैशंपायन म्हणे राया । तूं विसरलासी कां या । तुझ्या पूर्वजा पार्थराया । जें युद्धीं यदुवर्या बोलणें झालें ॥ ३६ ॥ ती मुख्य भगवद्गीता । जी उपनिषत् या वेदभारता[2] । तेथचि या धर्माची कथा । निरोपिली तूंतें ॥ ३७ ॥ म्हणीं वाटेल तुझिया अंतरीं । कीं गीता सांगितली द्वापारीं । तेव्हांचि धर्माची उत्पत्ति खरी । परि ऐसें म्हणूं नको ॥ ३८ ॥

संमितस्सामवेदेन पुरैवादियुगे कृतः ।
धार्यते स्वयमीशेन राजन्नारायणेन च ॥ १० ॥

**टीका**—सामवेदेन संमितः सामवेदोक्तं तत्वमसीति वाक्यं यथाधिकारिणः सद्यः ज्ञानजनकं एवं वैष्णवधर्मोऽपि शमादिमतां सद्यः कैवल्यहेतुरित्यर्थः ।

( मा० शां० प० अ० ३४८ )

श्लोकसहित टीकेचा भावार्थः—सामवेदीं तत्वमसि । वाक्य शीघ्र ज्ञानप्रद जीवासी । तैसा वैष्णवधर्मही सकळांसी । सद्य ज्ञानप्रद ॥ ३९ ॥ तत्वमसि वाक्य आपण । व्यतिरेकें आत्माकार वृत्ति करून । ज्ञानप्रद होय सकळां-कारण । भागवत धर्मही तैसाचि ॥ ४० ॥ यथा—

" सर्व भूतेषु यः पश्येत् भगवद्भावमात्मनः ।
भूतानि भगवत्यात्यन्येष भागवतोत्तमः ॥ ४५ ॥

( भाग० स्कंध ११, अ० २ )

जागृच्छ्रुतिश्च[3] भवति—" यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति । तस्माहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति " ॥

---

१ उदार गतीतें. २ भारतरूप वेदाची गीता ही उपनिषत्. ३ भगवद्गीता.

या दोन्ही वचनांचा अर्थ । ताततनाथोक्तीवरून[1] जाणावा यथार्थ । जयाचें निष्काम जाहलें चित्त । तया धर्म भागवत तारक ॥ ४१ ॥ किंवा " सामवेदेन संमितं " या वचनीं । भागवतस्मृतित्व प्रतिषेधुनी । मूलमूलीभाव निरा करोनी । सनातनत्व यालागुनी बोलिलें ॥४२॥ व्याससमाधिभाषा[2] भागवत । यालागीं तें सनातन समस्त । किंवा चतुःश्लोकी भागवत । बोलिलें हो का या स्थानीं ॥ ४३ ॥ हाचि ब्रह्मयातें वारंवार । धर्म उपदेशिला निर्धार । ऐसेंचि बोलिले आचार्यवर । आळंदीश्वर जगद्गुरु ॥ ४४ ॥

तें हे कल्पादि भक्ति मियां । श्रीभागवतमिषें ब्रह्मया ।
उत्तम म्हणोनि धनंजया । उपदेशिली ॥ ११३२ ॥ "

( ज्ञाने० अ० १८, श्लोक ५५ )

उत्तम म्हणजे वेदधर्माहुनी उत्कृष्ट । आन अर्थ आहे स्पष्ट । ईश्वरीं अर्पितां पूर्त इष्ट[3] । तरी वेदही भागवत होतु कां ॥४५॥ वेद भागवत स्वतःप्रमाण । मूलमूलीभावाचें नाहीं कारण । कोणी म्हणेल अप्रमाण वेदबाह्य म्हणोन । तरी भागवतबाह्य म्हणोन वेद अप्रमाण कां न होती ? ॥ ४६ ॥ वेद म्हणजे काय । मंत्र कीं ब्राह्मण होय ? । कीं दोनचि आन नोहे । तरी हें न घडे ॥४७॥ जीवोद्धारासाठीं शब्द । तो तो अवघा बोलिजे वेद । आतां भागवतीं वेदस्तुति विशद । ते वेदीं वेदनिर्देशवत् ॥ ४८ ॥ किंवा गोपालतापनीयादि श्रुति । याचि धर्मातें बोधिती । कालाग्निरुद्रादि श्रुति । बोधिती यातेंचि ॥ ४९ ॥ म्हणोनि शैव आणि वैष्णव । हा द्विविध धर्मही वैदिक स्वयमेव । तोचि चातुर्वर्ण्यार्थ विस्तृत सावेव । म्हणोनि सामवेदेन संमित म्हणिजे ॥५०॥ संक्षेप वदती गोपालतापनीयादि उपनिषद । म्हणोनि तो तव वेद । सर्वांसाठीं विस्तृत सांगे भागवत शुद्ध । यालागीं सामवेदसंमित म्हणावा ॥ ५१ ॥ किंवा कलिसंतरण-श्रुति । कृष्णयजुर्वेदीं नाममहिमा वदती । यालागीं वेदोक्तता

---

१ श्रीज्ञानेश्वर व एकनाथ यांच्या वचनांवरून. २ व्यासांनीं समाहित असतांना लिहिलेलें. ३ यज्ञादि वैदिक कर्मे.

तयाप्रति । तो बृहत्सामस्तुतितुल्य म्हणोनि सामवेदसंमित म्हणिजे ॥ ५२ ॥ आतां ऐसें वदेल कोणी । कीं मोहावया पाखंडियालागुनी । हा धर्म स्थापिला देवानीं । तरी तें म्हणणें अयोग्य ॥ ५३ ॥ पाखंडविस्तार कलींत । "कलौ आगमसंभवः" इत्यादि मेरुतंत्रोक्त । वाममार्गविस्तारही कलींत । आणि बौद्धादिविस्तारही कलींतचि ॥ ५४ ॥ गौतम दधीचि नारदशाप । आघवे कलीसाठींच संकल्प । यास्तव कृतयुगीं पाखंड्यार्थ भागवत हा जल्प[1] । करूं नये अल्प कोणीही ॥ ५५ ॥ पाखंडबाहुल्य होय जेव्हां । तंत्रप्रादुर्भाव होय तेव्हां । न्यूनपाखंडीस्वभावा । दंडक[2] सन्नृपाचि ॥ ५६ ॥ आतां आग्रहाचि करशील जरी । आम्ही आग्रहेंचि बोलूं तरी । वेदापूर्वीं कृतयुग निर्धारीं । भागवतधर्मचि पैं होता ॥ ५७ ॥ येविषयीं भागवत प्रमाण । आणि श्रीधराचें भाष्यही जाण । तेंही सावध करी श्रवण । धरी मौन[3] मग वादिन् ॥ ५८ ॥

आदौ कृतयुगे वर्णो नृणां हंस इति स्मृतः ।
कृतकृत्याः प्रजा जात्या तस्मात्कृतयुगं विदुः ॥

**टीका**—तत्रादौ मदुपासनालक्षण एवं मुख्यो धर्म आसीत् । आचारलक्षणस्तु पश्चात् प्रवृत्तः स च एवमनुष्ठितो भक्तिहेतुरिति वर्णयितुमाह । कल्पादौ यत्कृतयुगं तस्मिन् । ते च तदा मां उपासत एव केवलं नान्यत् कुर्वन्ति इति कृतयुगनामनिरुक्तिमाह । कृतकृत्या इति । जात्या जन्मनैव । किं च विधायकाभावादपि तदानीं नान्यत्कर्मास्तीत्याह ॥ १० ॥

वेदः प्रणव एवाग्रे धर्मोऽहं वृषरूपधृक् ।
उपासते तपोनिष्ठा हंसं मां मुक्तकिल्बिषाः ॥ ११ ॥

**टीका**—वेद इति । धर्मश्च मनोविषयः अहमेव वृषरूपधृक् चतुष्पाद् न क्रियाविशेषो यज्ञादिः अतस्तपोनिष्ठा । मनसश्चेंद्रियाणां च ह्यैकाग्र्यं परमं तप इति वचनात् एकाग्रतया हंसं शुद्धं मां ध्यायन्ति इत्यर्थः ॥ ११ ॥

त्रेतामुखे महाभाग प्राणान्मे हृदयात् त्रयी ।

---

१ चुकीचें भाषण. २ चांगल्या राजानें कायदा करावा. ३ निरुत्तर हो.

विद्या प्रादुरभूत्तस्या अहमासंस्त्रिवृन्मखः ॥ १२ ॥

**टीका**—पश्चात् त्रेतायुगप्रवेशे मे वैराजरूपस्य प्राणान्निमित्तात् हृदयात्सकाशात् तस्यास्त्रय्याः सकाशात् हौत्राध्वर्यवौद्गात्रैः त्रिवृत् त्रिरूपः ' यज्ञो वै विष्णुरिति ' श्रुतेः ॥ १२ ॥ ( भाग० स्कंध ११, अ० १७ )

आधीं धर्म मद्भक्तिलक्षण । उद्धवा सांगे श्रीकृष्ण । कर्म निघालें मागाहून । जेव्हां सत्वगुण खालावला ॥ ५९ ॥ कल्पाच्या आरंभीं जें युग कृत । तेव्हां एकचि हंसवर्ण विख्यात । चार वर्ण नव्हते तेथ । भेदें प्रवर्तित अखंड जे ॥ ६० ॥ तेव्हां मी धर्म होतों पूर्ण । नव्हतों पंगू क्रियालक्षण[१] । ज्यांत प्रत्यवाय क्षणक्षण । होय उत्पन्न सर्वदा ॥ ६१ ॥ होवोनिया तपोनिष्ठ । मज निर्मळा भजत होते श्रेष्ठ । भाव कीं भगवदुपासनेंत स्पष्ट । कर्मसमुच्चय अपेक्षित नाहीं ॥ ६२ ॥ हें कर्म, हें अकर्म, हें विकर्म । हा वेदेंचि केला नियम । तो वेदचि होता परम । प्रणवरूपधारी ॥ ६३ ॥ तें उपासना तरी माझें ध्यान । आणि यज्ञ तरी माझें प्रणवनामस्मरण । लोक निष्काम समाधान । सदा संपन्न मत्प्रेमें ॥ ६४ ॥ कोणी म्हणेल ही ज्ञानीस्थिति । तंव अवघेचि ज्ञानी होतील कृतयुगान्तीं । कामाभावें मैथुनप्रवृत्ति । होणार नाहीं तेधवां ॥ ६५ ॥ प्रारब्धही सत्वगुणी । आणि मुळींचेचि ज्ञानी । तेव्हां मैथुनप्रवृत्त्यभावें करूनी । पुढें सृष्टिचि न होवावी ! ॥ ६६ ॥ म्हणोनी हे नव्हे ज्ञानियाची स्थिति । यालागीं कृतयुगीं धर्म माझी उपास्ति । कर्मसमुच्चय तिजप्रति । अपेक्षित नाहीं ॥ ६७ ॥ म्हणाल ब्रह्माचि रजोगुणी आपण । तेणें कैसे अवघे केले सात्विक उत्पन्न ? । तरी आपुला नाहीं प्राणिया गुण । दिधला ब्रह्मदेवांनीं ॥ ६८ ॥ जयाचा गुणभाव जैसा । तो उत्पन्न केला तेव्हां तैसा । म्हणोनि कृतयुगीं हंसा । एकाचि वर्णा उपजविलें ॥ ६९ ॥ जेव्हां कर्मे रजोगुणाची प्रवृत्ति । तेव्हां जाहली कर्मस्थिति । तंव वादी म्हणे चतुर्वर्णप्रवृत्ति होती कृतीं[२] । ऐशींही पुराणवचनें ॥ ७० ॥ सिद्धान्ती म्हणे ऐक वचन । सहस्रयुग कल्पाचें प्रमाण ।

---

१ प्रत्यवायभयामुळें कर्ममार्गाला येथें पंगु म्हटलें आहे. २ कृतयुगांत.

स्वयें बोलिले भगवान । " सहस्रयुगपर्यंतमहर्यत् ब्रह्मणः " इत्यादि वचनीं ॥ ७१ ॥ त्या कल्पामाजीं युगें चारी । होती जाती बहुतांपरी । परी कल्प-प्रारंभीं जो कृतयुग निर्धारीं । तेव्हां असतो हंसवर्ण ॥ ७२ ॥ आणि कल्प-मध्यचौकडीचें जें कृत । सामान्य चाऱ्ही वर्ण असती तेथ । हाचि नारद-पुराणार्थ । अवलंबावा ॥ ७३ ॥ जैसें सांगे भागवत । तैसेंचि सांगे महाभारत । हें ' वर्णविचारकसमा 'त । बोलिलें आम्हीं ॥ ७४ ॥ त्रेतारंभीं झाले वेद तीन । तयांपासोनि यज्ञ उत्पन्न । तेव्हां धर्म क्रियालक्षण । शब्दार्थ आन स्पष्ट असे ॥ ७५ ॥ एवं कृतयुगीं नव्हता । कलियुगीं नासेल तत्वतां । ऐसिया मध्यप्रवृत्ता । धर्माधर्म कवण म्हणे ? ॥ ७६ ॥ आतां ईश्वरापासोन । दोन्हीही जाहले म्हणोन । निश्वासश्रुतिविरोध नाहीं उपपन्न । एवं उत्कृष्ट प्रमाण भागवतधर्मू ॥ ७७ ॥ तो विष्णूनें शिवभक्तिरूप । आणि शिवें नारायणभक्ति-रूप । स्वयें आचरिला सत्यसंकल्प । असोनीही कृतयुगीं ॥ ७८ ॥ येथोनि याचा संप्रदाय । तोही श्रवण करी स्वयें । श्लोकपदीं मुनिराय । बोलतू असती ॥ ७९ ॥

एतदर्थं महाराज पृष्टः पार्थेन नारदः ।
ऋषिमध्ये महाभागः शृण्वतोः कृष्णभीष्मयोः ॥ ११ ॥
गुरुणा च मयाऽप्येव कथितो नृपसत्तम ।
यथा तत्कथितं तत्र नारदेन तथा शृणु ॥ १२ ॥
यदासीन्मानसं जन्म नारायणमुखोद्गतम् ।
ब्रह्मणः पृथिवीपाल तदा नारायणः स्वयम् ॥ १३ ॥
तेन धर्मेण कृतवान्दैवं पित्र्यं च भारत ।
फेनपा ऋषयश्चैव तं धर्मं प्रतिपेदिरे ॥ १४ ॥
वैखानसाः फेनपेभ्यो धर्मं तं प्रतिपेदिरे ।
वैखानसेभ्यः सोमस्तु ततः सोऽन्तर्दधे पुनः ॥ १५ ॥
यदाऽऽसीच्चाक्षुषं जन्म द्वितीयं ब्रह्मणो नृप ।

यदा पितामहेनैव सोमाद्धर्मः परिश्रुतः ॥ १६ ॥
नारायणात्मको राजन् रुद्राय प्रददौ च तम् ।
ततो योगास्थितो रुद्रः पुरा कृतयुगे नृप ॥ १७ ॥
वालखिल्यानृषीन् सर्वान्धर्ममेतदपाठयत् ।
अंतर्दधे ततो भूयस्तस्य देवस्य मायया ॥ १८ ॥
तृतीयं ब्रह्मणो जन्म यदासीद्वाचिकं महत् ।
तत्रैष धर्मः संभूतः स्वयं नारायणान्नृप ॥ १९ ॥
सुपर्णो नाम तमृषिः प्राप्तवान्पुरुषोत्तमात् ।
तपसा वै सुतप्तेन दमेन नियमेन च ॥ २० ॥
त्रिःपरिक्रांतवानेतत्सुपर्णो धर्ममुत्तमम् ।
यस्मात्तस्मात् व्रतं ह्येतत् त्रिसौपर्णमिहोच्यते ॥ २१ ॥
ऋग्वेदपाठपठितं व्रतमेतद्धि दुश्चरम् ।
सुपर्णाच्चाप्यधिगतो धर्म एष सनातनः ॥ २२ ॥
वायुना द्विपदां श्रेष्ठ कथितो जगदायुषा ।
वायोः सकाशात्प्राप्तश्च ऋषिभिर्विघसाशिभिः ॥ २३ ॥
ततो महोदधिश्चैव प्राप्तवान्धर्ममुत्तमम् ।
अंतर्दधे ततो भूयो नारायणसमाहितः ॥ २४ ॥
यदा भूयः श्रवणजा सृष्टिरासीन्महात्मनः ।
ब्राह्मणः पुरुषव्याघ्र तत्र कीर्तयतः शृणु ॥ २५ ॥
जगत्स्रष्टुमना देवो हरिर्नारायणः स्वयम् ।
चिंतयामास पुरुषं जगत्सर्गकरं प्रभुम् ॥ २६ ॥
अथ चिंतयतस्तस्य कर्णाभ्यां पुरुषः सृतः ।
प्रजासर्गकरो ब्रह्मा तमुवाच जगत्पतिः ॥ २७ ॥
सृज प्रजाः पुत्र सर्वा मुखतः पादतस्तथा ।
श्रेयस्तव विधास्यामि बलं तेजश्च सुव्रत ॥ २८ ॥

धर्मं च मत्तो गृण्हीष्व सात्वतं नाम नामत ।
तेन सृष्टं कृतयुगं स्थापयस्व यथाविधि ॥ २९ ॥
ततो ब्रह्मा नमश्चक्रे देवाय हरिमेधसे ।
धर्मं चाग्र्यं स जग्राह सरहस्यं ससंग्रहम् ॥ ३० ॥
आरण्यकेन सहितं नारायणमुखोद्भवम् ।
उपादिश्य ततो धर्मं ब्रह्मणेऽमिततेजसे ॥ ३१ ॥
त्वं कर्ता युगधर्माणां निराशीः कर्मसंज्ञिनम् ।
जगाम तमसः पारं यत्राव्यक्तं व्यवस्थितम् ॥ ३२ ॥
ततोऽथ वरदो देवो ब्रह्मा लोकपितामहः ।
असृजत्स ततो लोकान्कृत्स्नान्स्थावरजंगमान् ॥ ३३ ॥
ततः प्रावर्तत तदा आदौ कृतयुगं शुभम् ।
ततो हि सात्वतो धर्मो व्याप्य लोकानवस्थितः ॥ ३४
तेनैवाद्येन धर्मेण ब्रह्मा लोकविसर्गकृत् ।
पूजयामास देवेशं हरिं नारायणं प्रभुम् ॥ ३५ ॥
धर्मप्रतिष्ठाहेतोश्च मनुं स्वारोचिषं ततः ।
अध्यापयामास तदा लोकानां हितकाम्यया ॥ ३६ ॥
ततः स्वरोचिषः पुत्रं स्वयं शंखपदं नृप ।
अध्यापयत्पुराऽव्यग्रः सर्वलोकपतिर्विभुः ॥ ३७ ॥
ततः शंखपदश्चापि पुत्रमात्मजमौरसम् ।
दिशां पालं सुवर्णाभमध्यापयत भारत ।
सोऽतर्दधे ततो भूयः प्राप्ते त्रेतायुगे पुनः ॥ ३८ ॥
नासत्ये जन्मनि पुरा ब्रह्मणः पार्थिवोत्तम ।
धर्ममेतं स्वयं देवो हरिर्नारायणः प्रभुः ॥ ३९ ॥
तज्जगादारविंदाक्षो ब्रह्मणः पश्यतस्तदा ।
सनत्कुमारो भगवांस्ततः प्राधीतवान्नृप ॥ ४० ॥

सनत्कुमारादपि च वीरणो वै प्रजापतिः ।
कृतादौ कुरुशार्दूल धर्ममेतदधीतवान् ॥ ४१ ॥
वीरणश्चाप्यधीत्यैनं रैभ्याय मुनये ददौ ।
रैभ्यः पुत्राय शुद्धाय सुव्रताय सुवेधसे ॥ ४२ ॥
कुक्षिनाम्ने स प्रददौ दिशां पालाय धर्मिणे ।
ततोऽप्यंतर्दधे भूयो नारायणमुखोद्भवः ॥ ४३ ॥
अंडजे जन्मनि पुनर्ब्रह्मणे हरियोनये ।
एष धर्मः समुद्भूतो नारायणमुखात्पुनः ॥ ४४ ॥
गृहीतो ब्रह्मणा राजन्प्रयुक्तश्च यथाविधिः ।
अध्यापिताश्च मुनयो नाम्ना बर्हिषदो नृप ॥ ४५ ॥
बर्हिषद्भ्यश्च संप्राप्तः सामवेदांतगं द्विजम् ।
ज्येष्ठं नामाभिविख्यातं ज्येष्ठं सामव्रतो हरिः ॥ ४६ ॥
ज्येष्ठाच्चाप्यनुसंक्रांतो राजानमविकंपनम् ।
अंतर्दधे ततो राजन्नेष धर्मः प्रभो हरेः ॥ ४७ ॥
यदिदं सप्तमं जन्म पद्मजं ब्रह्मणो नृप ।
तत्रैष धर्मः कथितः स्वयं नारायणेन ह ॥ ४८ ॥
पितामहाय शुद्धाय युगादौ लोकधारिणे ।
पितामहश्च दक्षाय धर्ममेतं पुरा ददौ ॥ ४९ ॥
ततो ज्येष्ठे तु दौहित्रे प्रादाद्दक्षो नृपोत्तम ।
आदित्ये सवितुर्ज्येष्ठे विवस्वान् जगृहे ततः ॥ ५० ॥
त्रेतायुगादौ च ततो विवस्वान्मनवे ददौ ।
मनुश्च लोकभूत्यर्थं सुतायेक्ष्वाकवे ददौ ॥ ५१ ॥
इक्ष्वाकुना च कथितो व्याप्य लोकानवस्थितः ।

( भा० शांतिपर्व, अ० ३४८ )

अर्थ संस्कृतवेत्ते जाणती । भावार्थ स्पष्ट करूं शके सकळांप्रति । विशेष

हा कीं प्रत्येक कृतयुगीं प्रवृत्ति । कल्पादौ झाली याचि धर्माची ॥ ८० ॥ मध्यें मध्यें जाहला क्षीण । तयापुढें प्रवर्तवी नारायण । एवं युगींयुगीं आपण । कल्पीं कल्पीं प्रवर्तवी ॥ ८१ ॥ नारायणापासुनी । हा धर्म मिळे बहुतां-लागुनी । एव संप्रदायकहाणी । धर्माची या ॥ ८२ ॥ 'सामवेदेन संमितं' म्हणतां । याची दाविली कर्मकांडभिन्नता । आणि ज्ञानकांडभिन्नता । तेही ऐके ॥ ८३ ॥

**सहोपनिषदान्वेदान्ये विप्राः सम्यगास्थिताः ।**
**पठन्ति विधिमास्थाय ये चापि यतिधर्मिणः ॥ ५ ॥**
**तेभ्यो विशिष्टां जानामि गतिमेकांतिनां नृणाम् ॥६॥** पूर्वार्ध.

**टीका**—जापकेभ्योऽपि भक्तानां श्रेष्ठां गतिमाह सहेति ।

( भा० शांतिपर्व० अ० ३४८ )

गृहस्थयतिधर्माहून । भक्तांची गति श्रेष्ठ मी जाणे पूर्ण । हे श्लोक पूर्वपक्ष न म्हणावेत कोण । पृच्छकाचे म्हणोनी ॥ ८४ ॥ याचें करोनी खंडण । वैशंपायन नाहीं वदले सिद्धान्त भिन्न । यास्तव गृहस्थयतिधर्माहूनी भिन्न । असे भागवत धर्म हा ॥ ८५ ॥ ज्ञान तंव उपनिषदांचें याचें एक । यतीच्या प्रणवजपाहुनी हा भिन्न देख । येथ सहाय सगुण रमानायक । म्हणोनी यास समर्थिलें गीताप्रमाणें पूर्वोध्दृत श्लोकीं ॥ ८६ ॥ हा जरी युगींयुगीं होय क्षीण । तरी याचे संग्राहक आचार्य आणिक मुनिजन । स्वयें नारदें संग्रहून । स्वसूत्रीं आणि पंचरात्रीं ठेविला हा ॥ ८७ ॥

**नारदेन सुसंप्राप्तः सरहस्यः ससंग्रहः ।**
**एष धर्मो जगन्नाथात्साक्षान्नारायणान्नृप ॥ ५४ ॥**

( भा० शांतिपर्व, अ० ३४८ )

**भावार्थ**—संग्रहित पंचरात्रीं केला । रहस्यें सूत्रीं निरूपिला । स्वामी नारदें अवलंबिला । नारायणापासुनी ॥ ८८ ॥ आणिकही संप्रदाय । याचे आहेत असती स्वयें । विष्णूनें बोधिला ब्रह्मा होय । ब्रह्मयानें नारदू ॥ ८९ ॥

नारदें व्यासा, व्यासें शुका । शुकें परिक्षिता दिधला देखा । विधिपासुनी हाचि आणिका । अत्रीतें मिळाला ॥ ९० ॥ अत्रीपासुनी दत्तात्रेया । त्यापासुनी जनार्दनादिकां साधुवर्या । तैसा विधिवसिष्ठशक्तिपराशरादिक्रमें करोनिया । व्यासादिकां प्राप्त हाचि ॥ ९१ ॥ शिवापासोनि उमेप्रति । शिवमुखेंचि मत्स्येंद्रचित्तीं । मत्स्येंद्रापासुनी गोरक्षाप्रति । गोरक्षपरंपरा गैनीतें ॥ ९२ ॥ गैनीपासुनि निवृत्तिराया । तेथूनि मिळाला आळंदीवर्या । तेथूनि सकळा यया । उगमू पुढती ॥ ९३ ॥ म्हणोनि कल्पीं कल्पीं युगीं युगीं । हाचि कल्याणप्रद सकळांलागीं । तंव वादी म्हणे प्रसंगीं । भलतेंचि वदतां ॥ ९४ ॥

कृते श्रुत्युक्तमार्गः स्यात् त्रेतायां स्मृतिभावितः ।
द्वापरे वै पुराणोक्तः कलावागमसंभवः[1] ॥ १ ॥ (रुद्रयामलतंत्र)

ऐसें आहे तंत्रवचन । यालागीं कलींत भगवद्भिन्न । देवाचें बोलिलें आहे सेवन । तरी भागवतधर्म सर्वत्र प्रमाण केवि ? ॥ ९५ ॥ सिद्धान्ती म्हणे, वैष्णवांप्रति । आगम पंचरात्रादि असती । म्हणोनि कलींतही भागवतधर्म-स्थिती । निश्चयें चाले ॥ ९६ ॥ कलींत विशेष भागवतधर्म । येथ सात्वतश्रुति मान[2] परम । पुराणविरोधी तंत्रप्रेम । नाहीं आम्हां ॥ ९७ ॥

कृतादिषु प्रजा राजन् कलाविच्छन्ति संभवम् ।
कलौ खलु भविष्यन्ति नारायणपरायणाः ॥ ३८ ॥
( भाग० स्कंध ११, अ० ५ )

कृतादीचे लोक । कलींत जन्म इच्छिती देख । कलींत अवतरतील सुरेख । साधू म्हणोनी ॥ ९८ ॥ भक्ति राहे कल्पादि कृतीं । परी कल्पमध्य-चौकडींत कर्मप्रवृत्ति । परी कल्पादिमध्यांत सर्व कलींत समान भक्ति । यास्तव कल्पमध्यकृतादिप्रजा इच्छिती कलींत जन्म ॥ ९९ ॥ या वचनें तंत्रवचन बाधित । अथवा याचा आन अर्थ । देव्युपासनेविषयीं निश्चित । वचन प्रवृत्त हें असे ॥ १०० ॥ कृतयुगीं श्रुतिप्रणीत । म्हणजे कर्म विख्यात और ।

---

१ आगम म्हणजे तंत्र; अन्य अर्थ स्पष्ट आहे. २ महत्त्वाची समज.

त्रेतायुगीं कर्म स्मार्त । विख्यात तंत्र हें सांगे ॥ १०१ ॥ द्वापरीं पुराणोक्त प्रवृत्ति । कलींत देवीपूजा करावी तंत्ररीती । आमुच्या भागवतधर्माप्रति । संपर्क नाहीं या वचनें ॥ १०२ ॥ तंव वादी म्हणे हें अनुचित । तुमचा धर्म केवी मिळेल सकळांप्रत । सिद्धान्ती म्हणे अन्यधर्म त्यागुनी समस्त । आमुचा धर्म घेयावा ॥ १०३ ॥ तव वादी म्हणे मेरुतंत्रीं वचन । कीं कुळ त्यागितां महाविघ्न । तेंही ऐकावें प्रमाण । सांगतो स्वयें ॥ १०४ ॥

> वाममार्गो यदा दक्षं प्रविशेत्तत्सुरैस्स तु ॥ ६४ ॥
> विघ्नेन पीड्यते चापि न सिद्धिमधिगच्छति ।
> दक्षमार्गो यदा वामं प्रविशेत्तत्सुरास्तदा ।
> लोकद्वयाद्यापयन्ति तं ग्रसंति च वामिनम् ॥ ६५ ॥
> तस्मात्स्वकुलमार्गं तु ज्ञात्वा कुर्यादुपासनम् ॥ ६६ ॥
> ( मेरुतंत्रप्रकाश १ )

वादीसंमत भावार्थ—स्वधर्म सोडूनि अन्य धर्म करितां । तरी तया भक्षिती देवता । यालागीं स्वकुलोक्ता । आचरावें ॥ १०५ ॥

सिद्धान्ती म्हणे तूं महाशाक्त । अखंड पूर्वपक्ष करिसी तंत्रोक्त । परि भगवद्भक्तासी देवताकृत । विघ्न नाहीं बाधत सर्वथा ॥ १०६ ॥

**त्वां सेवतां सुरकृता बहवोऽन्तरायाः । स्वौको विलंघ्य परमं व्रजतां पदं ते । नान्यस्य बर्हिषि बलीन्ददतः स्वभागान् । धत्ते पदं त्वमविता यदि विघ्नमूर्ध्नि ॥ १० ॥ ( भाग० स्कंध ११, अ. ४ )**

तुज सेवितां नारायणा । सुरवर विघ्नें करिती नाना । तैसें कर्मनिष्ठां न होय जाणा । ते देवांस पूजिती म्हणोनी ॥ १०७ ॥ मोक्षा जातां स्वर्ग उल्लंघून । देव रचिती नाना विघ्न । म्हणोनि श्रुति म्हणे आपण । कीं देवाराधन-तत्पर होवावें ॥ १०८ ॥

" तद्विदमप्येतर्हि य एवं वेदाहं ब्रह्मास्मीति स इदं सर्वं भवति

तस्य ह न देवाश्च नाभूत्या ईशते। आत्मा ह्येषां स भवति। अथ योऽन्यां देवतामुपास्तेऽन्योऽसावन्योऽहमस्मीति न स वेद यथा पशुरेवं स देवानाम्। यथा ह वै बहवः पशवो मनुष्यं भुञ्ज्युरेवमेकैकः पुरुषो देवान्भुनक्त्येकस्मिन्नेव पशावादीयमानेऽप्रियं भवति। किमु बहुषु तस्मादेषां तन्न प्रियं यदेतन्मनुष्या विद्युः" ॥ १० ॥

( बृहदारण्यक, अ० १, ब्रा० ४ )

तथापि विघ्नांचिया माथां । पाय देऊनि सर्वथा । तुझे भक्त अनाथनाथा । तूं रक्षक म्हणोनि निजात्मता पावती ॥ १०९ ॥ वरी प्रमाण जी दिधली श्रुति । ते देवतायजन सांगे अभक्त मुमुक्षुप्रति । किंवा देवतायजन भगवंतीं । अर्पावें हें सांगतू ॥ ११० ॥ जे अन्य देवता पूजिती । तेही अविधीनें[1] मज्चि भजती । अर्थ आगृच्छ्रुति[2] । स्वयें द्योती[3] गर्जोन ॥ १११ ॥ म्हणोनि भगवद्भक्ता । विघ्नभय नाहीं तत्वता । आणि उद्धृत केल्या वचनार्थां । त्वांचि जाणिलें नाहीं ॥ ११२ ॥ वाम आणि दक्षिण । शक्तियजनमार्ग[4] दोन । त्यांत आपाआपला सांडून । भलता भलत्यानें धरूं नये ॥ ११३ ॥ तंव वादी म्हणे दक्षिण मार्गांत । कृष्णादि मंत्र सांगितले मेरुतंत्रांत । सिद्धान्ती म्हणे त्या मंत्रजपाहूनि भागवतोक्त । मंत्र अथवा नामचि श्रेष्ठ ॥ ११४ ॥ वैदिक जपयज्ञाहूनि श्रेष्ठ भक्ति । याविषयीं तुज दाविली भारतोक्ति । तेथ कोण पुसे तांत्रिक मंत्राप्रति । आतां भागवतेतरधर्मत्यागार्थीं[5] प्रमाण आयिके ॥ ११५ ॥

**अवैष्णवोपदिष्टश्च पूर्वमंत्रवरद्वयम् ।**
**पुनश्च विधिना सम्यक् वैष्णवात् ग्राहयेन्मनुम् ॥ २ ॥**

**( पद्मपुराण उत्तरखंड, अध्याय २५४ )**

**जयासी नाहीं हरिभक्ति । तयाच्या मंत्रोपदेशें नाहीं गति । यास्तव त्याचा त्याग करोनि वैष्णवाप्रति । नित्य प्रणिपातीं भजावें ॥ ११६ ॥**

---

**१ मार्ग सोडून. २ भगवद्गीता. ३ प्रकट करवे. ४ शक्तिपूजेचे मार्ग. ५ भागवतधर्माहून इतर संप्रदाय सोडून द्यावे याविषयीं.**

**सहस्रशाखाध्यायी च सर्वयज्ञेषु दीक्षितः ।**
**कुले महति जातोऽपि न गुरुः स्यादवैष्णवः ॥ ३ ॥**

( पद्मपु. उत्तरखंड, अध्याय २५४ )

स्वर्गकामने झाला दीक्षित । वेदसहस्रशाखा मुखोद्गत । जन्म उत्तम ब्राह्मण कुळांत । परि नसतां हरिभक्त तो नव्हे गुरु ॥ ११७ ॥

**श्वपाकमिव नेक्षेत लोके विप्रमवैष्णवम् ।**
**वैष्णवो वर्णबाह्योऽपि पुनाति भुवनत्रयम् ॥ ५२ ॥**

( पद्मपु० उत्तरखंड, अ० २५२ )

गोविंदचरणकमळप्रीति । न वसे ज्या मूढाच्या चित्तीं । चांडाळासम तो ब्राह्मणजाती । नयनीं त्याप्रति पाहूं नये ॥ ११८ ॥ वैष्णव वर्णबाह्यही असतां । तरी पावन करी अवघिया जगता । तुकारामही तत्वतां । बोलिले ऐसें ॥ ११९ ॥

**अभक्त ब्राह्मण जळो त्याचें तोंड । काय त्यासी रांड प्रसवली ॥१॥**
**वैष्णव चांभार धन्य त्याची माता । शुद्ध उभयतां कुळ याती ॥२॥**
**ऐसा हा निवाडा झालासे पुराणीं । नव्हे माझी वाणी पदरींची ॥३॥**
**तुका म्हणे आगी लागो थोरपणा । दृष्टि त्या दुर्जना न पडो माझी**

( तुका० गाथा २४०६ )

म्हणोनि इतर देव त्यागितां । विघ्नभय न धरावें चित्ता । सुंदरदासही तत्वतां । बोलिले ऐसें ॥ १२० ॥

**होहि अनन्य भजे भगवंतहि और कछू उरमे नाहि राखे ॥**
**देवि रु देव जहां लग है डरके तिनकूं वहि दीन न भाखे ॥**
**जोग अरु जज्ञ व्रतादि क्रिया तिनकू तु नहीं सपने अभिलाखे ॥**
**सुंदर सूरप्रकाश भयो जब तौ कहु कौन हलाहल चाखे ॥**

( चूर्णिका )—वंव वादी म्हणे पुढती । श्रवण करी गा सिद्धान्ती ॥ “ यो वै स्वां देवतामतियजते प्रस्वायै देवतायै च्यवते न परां प्राप्नोति । पापीयान्

भवति" ऐसी आहे श्रुति । हिचा अर्थ कीं स्वदेव सांडुनी भजवां अन्याप्रति । तरी उभयभ्रष्ट होवोनि नरकाप्रति जाय ॥ १२१ ॥ सिद्धान्ती म्हणे ही श्रुति । म्हणते कीं सांडुनी श्रौत देवाप्रति । जे यक्षादि तांत्रिक यजती । तयांची गती महादुःख ॥ १२२ ॥ श्रुतींत सांगितलें हरिहरयजन । शूद्रास सांगितलें पौराण यजन । चांडाळास भाषांतरें[1] करून । हरिहरयजन बोलिलें ॥ १२३ ॥ ते सांडोनि विष्णुशिव । पूजिती सटवाई भैरव । यज्ञोपवीत सांडुनी गळां सर्व । कांचमाळा[2] घालिती ॥ १२४ ॥ प्रातःस्नान शीतभयें न करिती । आणि पुत्रासाठीं[3] नाडागळ खेळती । ब्राह्मण असोनि पीर पूजिती । त्यास ही श्रुती निंदिते ॥ १२५ ॥ असो एवं भगवद्भक्ता । विघ्न करूं न शकती देवता । जेणें सर्वभाव रमाकांता । वाहिले असती ॥ १२६ ॥ विघ्नाचें मुख्य कारण । अनात्मपदार्थीं माझेपण । ते पदार्थचि होतां ईश्वरार्पण । तरी विघ्नाचें स्थान निमालें ॥१२७॥ एवं अनन्य दासाप्रति । सर्वथा नाहीं विघ्न-भीति । परि अल्पहि असतां भगवद्भक्ति । विघ्ननिवृत्ति सांगती तात ॥१२८॥

**पैं रंक एक आडलेपणें । काकुळती धाव गा धाव म्हणे ।**
**तरी तयाचिये ग्लानी[4] धावणें । काय न घडे मज ? ॥१२२॥**
(ज्ञाने० अ० ८)

तंव वादी म्हणे बोलिलां पूर्वीं । कीं भलताही श्रद्धाळू तरे ऊर्वी[5] सिद्धान्ती म्हणे त्याविषयीं नुरवी । शंका कांहीं ॥ १२९ ॥ इतरत्र सत्व न्यून । यालागीं फलावधी गहन । परम सात्विक हरिहरभजन । तें शीघ्रफलद म्हणोन सांगों आम्ही ॥ १३० ॥ म्हणोनि श्रीज्ञानेश्वरु । मायबाप करुणाकरु । तयांचे चरणीं निर्धारू । धरावी आवडी ॥ १३१ ॥ ज्ञानराज माझी जननी । वारंवार विपेतें नमूनी । कविवाकमळमाळ चरणीं । वाहिली प्रेमें ॥ १३२ ॥

---

१ संस्कृत भाषेतून स्वभाषेंत भाषांतर करून. २ कांचेच्या मण्यांच्या माळा. ३ मुलगा व्हावा म्हणून. ४ संकटांत. ५ जगतांत.

प्रकरणाच्या देवपूजाप्रस्तावामध्यें "तत्रापि कलौ हरिहरयोः पूजा प्रशस्ता" इत्यादि वचनांनीं भट्टोजीदीक्षितांनीं निर्णय केला आहे. जीं वचनें एकाच्याच उपासनेचीं बोधक आहेत, तीं तत्तत्संप्रदायपर आहेत; परंतु सर्वांना हरिहराचीच उपासना विहित आहे हा विषय पुढेंहि आणखी सांगूं.

वादीः—ही माझी शंका सध्यां निवृत्त झाली; परंतु आपण सांगितलें कीं, वैदिक चिन्हें विशेष सत्वोत्पादन करितात, हें मला पटलें नाहीं; कारण जडांना सत्वोत्पादनाची तरी काय शक्ति आहे? दुसरें, सत्वपदार्थांविषयींही निरनिराळ्या प्रकारचे वाद आहेत. कल्किपुराणांत सांगितलें आहे कीं, विष्णूचा नैवेद्य म्हणजे सात्विक आहार समजावा.

उच्छिष्टमवशिष्टं वा पथ्यं पूतमभीप्सितम् ।
भक्तानां भोजनं विष्णोर्नैवेद्यं सात्विकं मतम् ॥ ४६ ॥
इंद्रियप्रीतिजननं शुक्रशोणितवर्धनम् ।
भोजनं राजसं शुद्धं आयुरारोग्यवर्धनम् ॥ ४७ ॥
( कल्किपुराण, अध्याय ११ )

(अर्थ स्पष्ट)–ह्या श्लोकांत जें अन्न राजस सांगितलें आहे, त्यालाच गीतेंत सात्विक म्हटलें आहे.

आयुःसत्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः ।
रस्याः स्निग्धाः स्थिरा हृद्या आहाराः सात्विकप्रियाः ॥८॥
( गीता, अ. १७ )

याप्रमाणें आणखी पुष्कळ सात्विक पदार्थांविषयीं व त्यांच्या लक्षणांविषयीं विवाद असून त्यांच्या फलांविषयींहि विवाद आहे. गीतेच्या सतराव्या अध्यायांत "यजन्ते सात्विका देवान्" असें सांगितलें असून "यान्ति देवव्रता देवान्" असें नवव्या अध्यायांत म्हटलें आहे. आणि "सत्वाद्धर्मो भवेद् वृद्धात्पुंसो मद्भक्तिलक्षणः" असें भागवतांत म्हटलें असून त्याचा अर्थ सत्व वाढल्यानें माझी भक्ति उत्पन्न होते असा आहे. तुम्ही सर्वांच भागवतधर्म

उपदेश करूं पाहतां, तर सर्वच सात्विक जन मिळणार तरी कसे ?

**ओव्या**—सिद्धान्ती म्हणे ऐक उत्तर । गुण जडाचेचि धर्म समग्र । " गुणाः प्रकृतिसंभवाः " हें शार्ङ्गधर । बोलिले स्वयें ॥ ३७६ ॥ कोणापासोनि सत्व कैसें । वाढे हें ईश्वर जाणतसे । सकळ मायेचा स्वामी विशेषें । तोचि म्हणोनी ॥ ३७७ ॥ जीव जाणता गुणसंक्रम । तरी तो झाला असतां सर्वज्ञोत्तम । यालागीं गुणवृद्धिकर्म । परमेश्वरोक्तशास्त्रेंचि कळे ॥३७८॥ पुरुष कर्म करी जेव्हां । गुण दोन परिणामें वाढ तेव्हां । मनोभावा आणि दैवा । निर्मितुचि ॥ ३७९ ॥ मनोभाव जीवा कळतो स्पष्ट । परि ईश्वरासचि कळे अदृष्ट । जरी वासनेहून अदृष्ट । फलदातें भिन्न नसतें ॥३८०॥ तरी सुखासाठीं परस्त्रीगमन । कारितां न होता नरक दारुण । स्वयेंचि दुःखामाजीं पतन । कवण वांछी ॥ ३८१ ॥ वासनासंवेग होतां तीव्र । तेंचि कर्म हा भागवतविचार । परी तेथही मानसजपादिवत् क्रियाप्रकार । विवक्षित आहे ॥ ३८२ ॥ वासनेनें अदृष्ट होत । परी वासना अदृष्ट नव्हे निश्चित । जैवीं बीजांतूनि वृक्ष उपजत । परी बीज वृक्ष वेगळाले ॥ ३८३ ॥ एवं मानसकर्में उपजे अदृष्ट । तेवीं वैदिक कर्मेंही उपजे स्पष्ट । नाहीं तरी तीर्थव्रतादि कटकट । म्हणावी लागेल ॥३८४॥ सात्विक आहारादिसेवनें करून । प्रथम सात्विक वासना उपजोन । मग अदृष्ट उपजे पूर्ण । हें सावधान धरीं चित्तीं ॥ ३८५ ॥ तुलसीमालादिकें करून । प्रथम अदृष्ट होय उत्पन्न । तेणें निरसोनिया विघ्न । पुढें वासना उपजवी ॥ ३८६ ॥ भगवद्भजनीं पाहतां । दोन्ही युगपत् उपजवी तत्वतां । गीतादिकांचा विरोध दाविला होता । त्यांचाही परिहार आतां ऐकें ॥ ३८७ ॥ सत्वाचे प्रकार दोन सम्यक । सूक्ष्म आणि वैकारिक । शुद्ध सूक्ष्म, मिश्र वैकारिक । भारतश्लोक मान येथ ॥ ३८८ ॥

**कामं देवा ऋषयश्च सत्वस्था नृपसत्तम ॥ ७८ ॥ उत्तरार्ध.**

**हीनाः सत्वेन सूक्ष्मेण ततो वैकारिकाः स्मृताः ॥ ७९ ॥ पूर्वार्ध**

**( महाभारत शांतिपर्व मोक्षधर्म अ० ३४८ )**

**भावार्थ**—ऋषि देव सात्विक असती । परि सूक्ष्म सत्व नाहीं त्यांचे चित्तीं । म्हणोनि वैकारिक म्हणिजेती । अन्यगुणसंस्पर्शे ॥ ३८९ ॥ यास्तव गीतेंत सांगितला आहार । तो वैकारिक सत्वपर । किंचिद्राजस सत्वनिर्भर । कालिकपुराण त्यातेंचि म्हणे ॥ ३९० ॥ तो वैकारिकचि आहार जेव्हां । भगवन्नैवेद्य होय तेव्हां । सूक्ष्म सात्विक स्वभावा । प्राप्त होय ॥ ३९१ ॥

**चूर्णिका**:—मांसादिकांचें करावया व्यावर्तन[1] । त्वदुद्धृत कालिकपुराण-श्लोकीं " पथ्यं पूतं " इत्यादि पदें उपलभ्यमान[2] । जे हरिवंशीं कथा कीं कृष्णास ब्राह्मणमांस दे घंटाकर्ण । परि तें नाहीं स्वीकारिलें भगवतानें । गीतेंत जरी तामस सांगितलें उच्छिष्ट अन्न । तरी तें समजावें विष्णुनैवेद्याभिन्न । आणि किडे पडले शिळा नैवेद्य होवोन । तरी तेथ इच्छा न होय उत्पन्न । तो भगवदुच्छिष्ट न राहतां कृम्युच्छिष्ट होय म्हणून । त्याचें करावया व्यावर्तन । विष्णु-उच्छिष्ट असून । त्याची चिळस न येतां इच्छा झाली पाहिजे उत्पन्न । तोचि सात्विक हें सांगावया कारण । "अभीप्सितं" हें पद श्लोकीं ॥ ३९२ ॥ किंवा प्रसादाचा अनादर । न करावा हें " अभीप्सित " पद द्योती[3] समग्र । घंटाकर्णाचा होता स्वाभाविक मांसाहार । त्याच्या प्रेमाचाचि देव करी अंगिकार । अंतर्यामीं अर्पण तव कोणताही होय आहार । म्हणोनि सात्विका सात्विकाचि आहार । सेव्य; याचा पुढें सांगूं विचार । आतां गुणफलविरोध-परिहार ऐके ॥ ३९३ ॥

**ओव्या**--ज्या सत्वें देवास जावोनि मिळती । तें वैकारिक सत्व ओळखे चित्तीं । ज्या सत्वें उपजे भगवद्भक्ति । तें सूक्ष्म सत्व ओळखावें ॥ ३९४ ॥ या दोहींसचि मिश्र आणि शुद्ध म्हणोन । विवेकचूडामणींत सत्वभेद केलें वर्णन । भागवत एकादशस्कंधीं स्थानादिकांचें जें निर्गुणपण । बोलिलें तें सूक्ष्मसत्वाभिप्रायेंकरून जाणावें ॥ ३९५ ॥

**चूर्णिका**—आणिक तुझा प्रश्न । कीं अवघ्यांसचि भागवतधर्म केवी

---

१ निषेध. २ सांपडतात. ३ दाखविते.

होईल मान्य । सर्वही सात्विक नाहीं म्हणून । तरी त्याचेंही एक समाधान । सामर्थ्य आहे आम्हांकारण । धर्म हें विश्वचि नियमावयालागून । जे केवळ सामान्य नीति सांगून । एखाद्यावरी विश्वास ठेवा म्हणती बलेंकरून । त्यांच्या-तचि मतें होतीं भिन्न । कोणी नास्तिक होती स्वार्थी, नीति सोडून । कोणी म्हणती विश्वास कां ठेवावा विचारावीण । परी आम्ही सांगतों श्रुतियुक्तिअनु-भवानं[1] । म्हणूनि प्रमाण आमुचें मानी ॥ ३९६ ॥

**ओव्या**—जेथ आम्ही नाहीं वदत युक्ति । तेथ इतरांसही श्रद्धेविण नाहीं गती । जेथ आम्ही वदतों युक्ति । तेथ इतर म्हणती विश्वासेंचि जावें ॥ ३९७ ॥ श्रद्धा तीव्र ज्याची जेथें । ते निष्काम असतां, जन्मांतरीं पावतील अस्मद्-धर्मातें । आणि मृदुश्रद्धेचे परमार्थ-इच्छित । उपदेशें येतील मद्धर्मी ॥ ३९८ ॥ येथ त्यांची विचारें श्रद्धा होईल तीव्र । मग ते चाऱ्ही वर्ण अथवा वर्णेतर । बाह्य भक्ति करतील जरी निर्धार । तरी वासना शुद्ध होईल परी निर्विघ्नकर । दैव उपजेल जन्मांतरीं ॥ ३९९ ॥ अंतर्भक्ति करतील कोणी । तरी वर्या वासना दैवशुद्धि[1] याचि जन्मीं दोन्ही । द्विजां तव वैदिकधर्म पाळोनी । भाग-वतधर्म पाळितां ये ॥ ४०० ॥ धर्म अधर्म विधर्म । हे भविष्योत्तरपुराणीं बोलिले परम । वैदिक भागवत म्हणिजे धर्म । आन धर्म अधर्म तो ॥ ४०१ ॥ धर्म तो होय देवांचा । अधर्म होय दैत्यांचा । विधर्म दोघांहि न माने साचा । जो नरकाचा दायकू ॥ ४०२ ॥ धर्में सुखरूप सुरालय । अधर्में[2] सुखरूप पाताळ होय । विधर्में मिळे यमालय । भगवद्भक्त वेगळा होय या तिहींहूनी ॥ ४०३ ॥ हें भविष्योत्तरपुराणीं । प्रतिसर्गपर्वणीं । चतुर्थ खंडीं पाहुनी । घ्यावें अकरावे अध्यायीं ॥ ४०४ ॥

**गद्य**—मला थोडासा परधर्मविचारही करणें भाग पडणार आहे; परंतु तो मी प्राचीन आर्यग्रंथानुसारच करणार आहें. एवढ्याकरितां प्राचीन लेखन-

१ दैवाची अनुकूलता. २ अन्य धर्मांनी.

रीति सोडून आधुनिक रीतीला अनुसरून हा ग्रंथ लिहिला आहे, असें कोणी म्हणूं नये, एवढी विनंती आहे.

## जगांतील पांच मोठे धर्म.

**ओव्या**—आतां जगाचा पाहतां विचार । पांच धर्म मोठे भूवर । मनुष्यकल्पित इतर । धर्मांतर[1] बहुत असती ॥ ४०५ ॥

**चूर्णिका**—आर्यधर्म, बौद्धधर्म, ईशपुत्रधर्म, पार्शीधर्म आणि माहमदी धर्म ॥ आर्यधर्म वेदभागवत-। भेदें करून सकळां विश्रुत । आणि बौद्धधर्म तदागमेंकरून जाणती समस्त । निरूपिला आहे सूतसंहितेंत । किंवा मत्कृत मधुरमाधुकरींत पहावा ॥ ४०६ ॥ गुरुंडांचा[2] ईशपुत्रधर्म । भविष्योत्तरपुराणीं त्याचें वर्म । तोही श्लोक परम । एक तुजप्रति सांगतों ॥ ४०७ ॥

विकटान्वयसंभूता गुरुंडा वानराननाः ।
वाणिज्यार्थमिहायाता गौरुंडा बौद्धपंथिनः ॥ ७२ ॥
ईशपुत्रमते संस्थाः तेषां हृदयमुत्तमम् ॥ ७३ ॥

( भवि० प्रतिसर्गपर्व खंड ४, अ० २२ )

**चूर्णिका**—याचा भावार्थ स्पष्ट समग्र। परि हे श्लोक पाश्चात्यपर । बौद्धांतूनि ईशपुत्रधर्म निघाला । हें आतांही बहुलोक बोलती बोला । बौद्धांच्या जातकाचा मेळ पडला । स्वधर्मासि म्हणती तेचि लोक ॥ ४०८ ॥ ईशपुत्रधर्मांत जी कथा । कीं सृष्टीचा प्रलय झाला होता । तेव्हां देवानें न्यूह[3] नावेंत बैसविला होता ॥ न्यूह म्लेच्छ होता । परि म्लेच्छ शब्दास नाहीं निघता । हीचि भविष्यपुराणीं प्रतिसर्गपर्वणी । प्रथमखंडीं चौथे अध्यायीं कथा । तेथिल एखादा श्लोक आतां । सांगतों ऐक ॥ ४०९ ॥

सदेहः स्वर्गमायातो मोक्षधर्मपरायणः ।
आचारश्च विवेकश्च द्विजता देवपूजनम् ॥ ४१ ॥
कृतान्येतानि तेनैव तस्मात् म्लेच्छः स्मृतो बुधैः ।

---

१ दुसरे धर्म. २ खिस्त्यांचा. ३ नोहा.

विष्णुभक्त्याग्निपूजा च ह्यहिंसा च तपो दमः ॥ ४२ ॥
धर्मान्येतानि मुनिभिर्म्लेच्छानां हि स्मृतानि वै ॥ ४३ ॥

**वादी**–हेच जर म्लेच्छधर्म असतील, तर आर्यांचा व म्लेच्छांचा भेद तो काय असणार ?

**सिद्धान्ती**—आहे तर; नाहीं कसा ? आम्ही पूर्वींच सांगितलें आहे कीं, भागवतधर्म हा सर्वांना सारखा लागू आहे. प्रमाण घेतलेल्या श्लोकांत जे म्लेच्छांचे धर्म सांगितले, ते भागवतरूप आहेत; कारण त्यांत विष्णुभक्ति आहे, आणि त्याच अध्यायांत न्यूह, ज्याला आतां गुरुंडी[1] भाषेत नोहा म्हणतात, तो कसें ध्यान करीत होता हें पुढें सांगितलें आहे.

न्यूहः स्मृतो विष्णुभक्तः सोऽहंध्यानपरायणः ।
एकदा भगवान् विष्णुस्तत्स्वप्ने तु समागतः ॥ ४७ ॥

या न्यूहाची सोहं इत्यादिकें करून निर्गुण उपासना व 'विष्णु भगवान् स्वप्नांत आले होते ' इत्यादिकें करून सगुणोपासना द्योतित केली आहे. ही कथा संपूर्ण पहावयाची असल्यास हा अध्याय वाचून पहावा. याप्रमाणें या म्लेच्छ धर्माचें व भागवत धर्माचें जरी साम्य असलें तरी सध्यांचें ईशपुत्रमत[2] थोडेंसें बौद्धधर्माशीं व थोडेंसें यवनधर्माशीं मिश्र झालें आहे. बौद्धांतून तें निघालें आहे हें मागें लिहिलेल्या श्लोकांत आलेंच आहे. आतां

### यवनमताचें लक्षण

काय आहे तें थोडक्यांत ऐक.

ईश्वरः कारणं यस्मादृश्योऽस्ति जगतः सदा ॥३०३॥ उत्त०
श्रुतिस्मृतीविना धर्माधर्मौ स्तस्तच्च यावनम् ।
श्रुत्यादिभिन्नधर्मोऽस्ति यत्र यद्यावनं मतम् ॥३०४॥

हा श्लोक शुक्रनीतींत चौथ्या अध्यायांत आहे. जगाचें कारण व नेहमीं आरंभ नसलेला एक ईश्वर आहे, असें ते मानतात. यांचे धर्म व अधर्म श्रुति-

१ इंग्रजी. २ खिस्तीधर्म.

स्मृतिरहित आहेत, म्हणजे श्रुतींत ज्याला अधर्म म्हटलें आहे त्याला हे अधर्मच म्हणतील असा कांहीं नियम नाहीं. यांचा आचार भविष्योत्तर पुराणांत जसा सांगितला आहे, तो थोडक्यांत सांगतों —

महमदश्च तैः सार्धं सिंधुतीरमुपाययौ ॥१५॥
पैशाचं देहमास्थाय भोजराजं हि सोऽब्रवीत् ॥२४॥
ईशाज्ञया करिष्यामि पैशाचं धर्मदारुणम् ।
लिंगच्छेदी शिखाहीनः श्मश्रुधारी स दूषकः ॥२५॥
उच्चालापी सर्वभक्षी भविष्यति जनो मम ।
विना कौलं च पशवस्तेषां भक्ष्या मते मम ॥२६॥
मुसलेनैव संस्कारः कुशैरिव भविष्यति ।
तस्मान्मुसलवंतो हि जातयो धर्मदूषकाः ॥२७॥
( भविष्यपु० प्रतिसर्ग० खंड ३, अ० ३ )

याचा अर्थ एखाद्या भाषांतरांतून पाहून घ्यावा. मला कंटाळा आल्यामुळें लिहीत नाहीं. वाटल्यास कोणी कोठून समजून घ्यावा.[1] सांगावयाचें इतकेंच कीं, सध्यांचे ईशपुत्रमत यवनमतांत वर्ज्य केलेलें कौलमांस वर्ज करीत नाहीं. तेव्हां अशा प्रकारच्या या म्लेच्छधर्मांशीं व आर्यधर्माशीं भेद आहेच. वर जे म्लेच्छांचे भागवतधर्म सांगितले, त्या धर्मानें तुकाराममहाराज जसे वैकुंठास गेले, तसा तो म्लेच्छराजाही स्वर्गाला गेला; परंतु तुकाराममहाराज निस्पृह असल्यामुळें वैकुंठाला गेले, व त्यानें राजधर्म पाळल्यामुळें थोड्याशा रजोगुणामुळें त्याला स्वर्गाला जावें लागलें, असा मी निर्णय करितों. आतां ईशपुत्रमत

१ "महमद त्यांच्याबरोबर सिंधुतीरास जाऊन, पिशाचदेह धारण करून भोजराजास म्हणाला—ईश्वराच्या आज्ञेनें मी एक भयंकर पिशाचधर्म स्थापन करतों. त्यांत मनुष्यें सुंता करतील, शेंडी काढून दाढी ठेवतील, ओरडून बोलतील व हवें तें खातील. पशु मारून खातील. मुसळानें व दर्भानें त्यांचा संस्कार होईल व म्हणून ते धर्मदूषक लोक मुसलमान म्हणून म्हटले जातील.

गुरुंडांमध्यें आहे, ते गुरुंड म्हणजे कोण हें तुला कळण्याकरितां त्यांच्या भाषेचें मी भविष्यपुराणांतून उदाहरण देतों.

रविवारे च सन्डे च फाल्गुने चैव फर्वरी ।
षष्ठिश्च सिक्सटी ज्ञेया तदुदाहारमीदृशम् ॥
( भवि० प्रति० पर्व खंड १, अ० ५ )

**वादी**--या अध्यायांत महाराष्ट्रभाषेलाही म्लेच्छ म्हटलें आहे.

**सिद्धान्ती**--म्हटलेलें असो; परंतु तेथील लोक वेदभागवतानुकूल असल्यामुळें, अनार्य नाहींत. आतां

### पार्शिकांसंबंधीं माहिती

सांगतों. ' पार्शिकास्ततो जेतुं ' इत्यादि श्लोकांत पार्शिकांचें नांव प्राचीन अर्वाचीन काव्यांतून आढळतें. मेरुतंत्रांत त्याविषयीं असें म्हटलें आहे—

श्रीदेव्युवाच-क्वचिद्दक्षं क्वचिद्वामं क्वचित्सौरं च शांभवम् ।
ऊर्ध्वाम्नायं क्वचिद्दक्षमुत्तरं पश्चिमं क्वचित् ॥१॥
ऊर्ध्वं आम्नायकं चापि गाणपत्यं च वैष्णवम् ।
पारसीकं क्वचिद्बौद्धं पाखंडं च क्वचित् क्वचित् ॥२॥
तत्तत्प्रकरणे स्तौषित् क्वाचिन्निन्दासि तं पुनः ।
क्वचिन्निर्दैवतं मार्गं वेदान्तं वैदिकं क्वचित् ॥३॥
द्वीपधर्मान्खंडधर्मान्कुलधर्मान्क्वाचित्क्वचित् ।
देशधर्मान्कालधर्मान् जातिधर्मान् क्वचित् क्वचित् ॥४॥
तंत्रोक्तमिदं तंत्रं प्रसन्नश्चेन्ममोपरि ।
तदा तत्वं मम ब्रूहि निःसंदेहा च मां कुरु ॥५॥
( मेरुतंत्रप्रकाश १० )

हा देवीचा शंकराला प्रश्न आहे, आणि श्लोकांचा अर्थ स्पष्ट आहे. यांत दुसऱ्या धर्मांबरोबर पार्शिक धर्माचें नांव घेतलें आहे, व तो धर्म शिवकृतच आहे असें ह्यावरून पाहतां आधुनिक रीत्यनुसारी होईल म्हणून मी लिहीत नाहीं.

त्याविषयीं विचार अलोकव्याख्यानमालेंत करीन.

## बौद्ध धर्म

आतां बौद्धासंबंधीं थोडक्यांत माहिती सांगतों. " सर्वं शून्यं शून्यं, सर्वं दुःखं दुःखं, सर्वं स्वलक्षणं स्वलक्षणं, सर्वं क्षणिकं क्षणिक, " अशा त्यांच्या चार भावना आहेत. त्यांचा विशेष सर्वदर्शनसंग्रहांतून पाहून घ्यावा. बुद्धदेव हा परमेश्वराचा अवतार आहे हें भागवतादि पुराणांत स्पष्ट आहे. परंतु बौद्धलोक बुद्धाला अवतार समजत नाहींत. एक जैनधर्मही बौद्धाला थोडासा अनुकूल व थोडासा निराळा आहे. हे दोन्हीही धर्म अहिंसेला आचार समजत असून, बौद्धधर्म, मेलेल्या प्राण्याचें मांस खाण्यास मना करीत नाहीं, व जैन धर्म करतो. आर्हतराजापासून जैन धर्म निघाला आहे, अशी भागवतांत कथा आहे, आणि सूतसंहितेच्या यज्ञवैभवखंडांत बौद्धधर्माहून त्याला उत्कृष्ट मानलें आहे.

आतां मनुष्यकल्पितही कांहीं धर्म आहेत. ते उत्कृष्ट पूजेवर अवलंबून आहेत. जसें वऱ्हाडांतील दिवाळीच्या गाण्यांत " चवरा गोंड्याची माबली । अशी विफन माउली " याप्रमाणें गहूं पेरणाऱ्या तिफणेची अवदाशी म्हणून स्तुति केली आहे, व तिफणीपेक्षां गाईला वरिष्ठ मानलें आहे. " शेवटीं ओवाया ओवाया[1]। फुला चंबेलीच्या माया[2]। घाला भिवरीच्या गया[3] । लागा माऊलीच्या पायां " ह्या सर्व अशुद्ध भाषेंत ळकाराचा यकार अपभ्रंश झाला आहे. याप्रमाणें आश्विन शु. १५ चे दिवशीं मातीची पुतळी करून पुजतांना मुली गाणीं म्हणत असतात. " चलना भुलाई लगना जाऊं " इत्यादि त्यांचीं गीतें आहेत. ह्या गाण्यांची भाषा अत्यंत निरर्थक असून त्याला यमकें मात्र असतात. जसें " मोत्याले आल्या शेंगा । बाळ व पोरी गिंगा " परंतु गीत गातांना त्यांच्या मनांत एक देवीभावना असते. आसरा म्हणून कांहीं बाळ देवी आहेत, त्यांचा ह्या भुलाईवर आरोप करतात. हा प्रकार सर्व वऱ्हाडांत

१ ओवाळा. २ माळा. ३ गळा.

प्रसिद्ध आहे असाच इतर देशांतही असतो. ह्यांत श्रेष्ठ धर्म कोणता हें मी प्रथम सूतसंहितेंत सांगितलें तसें सांगून, नंतर त्यांना भागवत कसें करावें हें सांगतों—

स्वमनीषिकयोत्पन्नो[1] निर्मूलो[2] धर्मसंज्ञितः ।
श्रद्धया सहितो यस्तु सोऽपि धर्म उदाहृतः ॥ १३ ॥
( सूतसंहिता, यज्ञवैभवखंड, अ० २० )

( अर्थ स्पष्ट. ) ह्या धर्माला धर्म म्हणण्याचें कारण, आपल्यापेक्षां कांहीं तरी विशेष आहे अशी कल्पना आहे, एवढेंच आहे केवळ नास्तिकापेक्षां यांच्यांत श्रद्धा असते. झाड तिकण वगैरेचे ठिकाणीं पूज्यभाव ठेवणें यांत कांहीं तरी देहाहून भिन्नवृत्ति धरावी लागते. नास्तिकांना ती मुळींच धरावी लागत नाहीं, म्हणून हा धर्म आहे.

वादीः-अहो, सूतसंहितेंत चार्वाकधर्माला देखील थोडेंसें बरें मानलें आहे !

सिद्धान्तीः—केवळ देहावर बुद्धि ठेवून, कुठें श्रद्धा न ठेवून, इच्छेस वाटेल तसें वागणाऱ्या मनुष्यापेक्षां व्यवहारचातुर्य तरी त्यानें[3] येतें, इतक्याच पुरतें बरें मानलें आहे. किंवा छांदोग्यांतलि विरोचनाप्रमाणें देहाला जरी ब्रह्म समजलें, तरी भूचरी मुद्रेनें त्याचें ध्यान करून, किंवा दर्पणयोगानें ध्यान करून आलोकयोगांत जातां येईल, असा हा देहात्मभावनेचा थोडा उपयोग असल्या-मुळें, चार्वाकधर्माला बरें म्हटलें आहे; परंतु त्यांतील तत्वज्ञान दूषित आहे. त्यापेक्षां या मनुष्यकल्पित धर्मांत विशेष श्रद्धा आहे म्हणून तो विशेष आहे. ज्या धर्माचा आचार अज्ञातसिद्ध[4] असून सत्ववर्धक आहे, आणि तत्वज्ञान अबाधित असून धर्माचा व तत्वज्ञानाचा मेळ आहे, आणि तशीच परंपरा अविच्छिन्न कायम ठेवण्याचा ज्या धर्मांतील आचार्यांचा उद्योग झाला आहे, तो धर्म उत्तम गणला गेला आहे. तसा एक श्रौतधर्म आहे, हें ह्या सूत-

---

१ आपल्या इच्छेनें बनविलेला. २ ज्यास दुसरा आधार नाहीं. ३ चार्वाक मतानें. ४ मनुष्याला स्वभावतः न कळणारा.

संहितेंत श्लोकक्रमानें सांगतात:—

निर्मूलोऽपि स्वबुद्धयैव कल्पितोऽपि महर्षयः ।
देवताराधनाकारो धर्मः पूर्वोदिताद्वरः ॥ १४ ॥

निर्मूल म्हणजे ज्याला शास्त्रप्रमाण नाहीं असा. देवताकार म्हणजे तिफणी-पेक्षां कोणी तरी देव निराळा आहे अशा समजुतीचा. विष्ठामूत्रादि सर्वच निकृष्ट समजतात, म्हणून त्याला कोणी देव मानीत नाहींत. शिवांबुकल्पादि-कांत "मूत्रपानं शिवेनोक्तम्" इत्यादि अल्पमूत्रानें त्याणपिणें लिहिलें आहे, तें देव मिळण्याचें साधन समजून लिहिलें आहे; ईश्वर समजून लिहिलें नाहीं. ह्यांना देखील भागवत वगैरे ग्रंथांतील मी मागें एका कुसुमांत सांगितली आहे.

देवताराधनाकारान्निर्मूलाद् बुद्धिकल्पितात् ।
धर्माच्छ्रेष्ठः समाख्यातः समूलो धर्म आस्तिकाः ॥ १५ ॥

समूल म्हणजे विशेष पुरुषानीं घालून दिलेला असा; परंतु तो पुरुषही रानटी लोकांतलाच विशेष समजावा. हा धर्म पिशाचपूजादिरूप असतो; परंतु तंत्रोक्त पिशाचपूजा समजू नये. त्या पुरुषानें घालून दिलेली पिशाच-पूजा समजावी.

समूलेषु च धर्मेषु बुद्धागमसमन्वितः ।
धर्मः श्रेष्ठ इति प्रोक्तो धर्मतत्वविशारदैः ॥ १६ ॥
बुद्धागमोदिताद्धर्मादर्हागमसमीरितः ।
धर्मः श्रेष्ठ इति प्रोक्तो धर्मतत्वविशारदैः ॥ १७ ॥ अर्थ स्पष्ट—

बुद्धधर्माहून जैनधर्माचें श्रेष्ठतेचें कारण आतां सांगितलें आहेच.

अर्हागमोदिताद्धर्मात्प्राजापत्यागमोदितः ।
धर्मः श्रेष्ठ इति प्रोक्तः सर्वधर्मार्थवेदिभिः ॥ १८ ॥
प्राजापत्यागमे प्रोक्ताद्धर्माद्वेदविदां वराः ।
मया श्रेष्ठ इति प्रोक्तो धर्मो विष्ण्वागमोदितः ॥ १९ ॥

विष्णवागमोदिताद्धर्मादशेषादस्तिकोत्तमाः ।
शैवागमोदितो धर्मो वरिष्ठो नैव संशयः ॥ २० ॥
शैवागमोदितो धर्मो द्विधा पूर्वमुदीरितः ।
अधःस्रोतोद्भवस्त्वेक ऊर्ध्वस्रोतोद्भवोऽपरः ॥ २१ ॥
अधःस्रोतोद्भवाद्धर्मादूर्ध्वस्रोतोद्भवः परः ।
कामिकादिप्रभेदेन स भिन्नोऽनेकधा द्विजाः ॥ २२ ॥
अधःस्रोतोद्भवो धर्मो बहुधा भेदितस्तथा ।
ऊर्ध्वस्रोतोद्भवाद्धर्मात्स्मार्ता धर्मा महत्तराः ॥ २३ ॥
स्मार्तेभ्यः श्रौतधर्माश्च वरिष्ठा मुनिसत्तमाः ।
तेषां शाखादयः श्रेष्ठास्तेषां भस्मावगुंठनम् ॥ २४ ॥
रुद्राक्षधारणं चापि शिवाद्याख्याभिभाषणम् ।
शिवलिंगार्चनं भक्त्या शिवोऽहमिति भावना ॥ २५ ॥
शिवज्ञानैकनिष्ठस्य शुश्रूषा च विशिष्यते ।
तेषां वेदान्तवाक्यानां तात्पर्यस्य निरूपणम् ॥ २६ ॥
वरिष्ठं सर्वधर्मेभ्यो ज्ञानं मोक्षैकसाधनम् ।
ज्ञानान्नास्ति परो धर्म इति वेदार्थनिर्णयः ॥ २७ ॥

( सूतसंहिता—यज्ञवैभवखंड—अ० २० )

अर्थ संस्कृतवेत्त्या पंडितांना माहित आहे, व मलाही माहित आहे. परंतु कंटाळा आल्यामुळें लिहीत नाहीं; व अर्थ स्पष्टहि आहे. येथें विष्णवागम म्हणजे नारदपंचरात्र किंवा भागवत समजूं नये, तर दुसरें कर्महीनागम[1] समजावें. याचा विशेष विचार पुढें सांगेन. अथवा सूतसंहिता शिवपुराण असल्यामुळें विष्णवागमाला न्यून सांगितलें आहे. असें विष्णुपुराणांत शिवालाही न्यून सांगितलें आहे. भागवतांत ज्ञानसमुच्चित[2] विष्णुभक्ति व सूतसंहितेंत ज्ञानसमुच्चित शिवभक्ति मुख्य सांगितली आहे, म्हणून अवांतर विरोध असला तरी मुख्यतः

१ कर्महीन शास्त्र. २ ज्ञानानें युक्त.

विरोध नाहीं. ह्याचाही विशेष विचार पुढें सांगेन. हे जे सर्व धर्म सांगितले, ह्या सर्व धर्मांत, हे असेचे असेच राहिल्यास, मनुष्यकल्पित धर्मांतील पुरुष, प्रारब्धविशेषावाचून, त्याच कमानें जात आहे असें गृहीत केलें तर, वैदिक धर्मांत येण्याला त्याला कल्पासारखा काळ लागेल, व इतर धर्मांला युगासारखा लागेल; आणि बौद्ध जैन तांत्रिक धर्मांना जन्मांतर लागेल. हा सर्व काल वैदिकधर्मयोग्यता येण्याचा आहे; कारण ज्या धर्मांत ईश्वर नाहीं, त्या धर्मांला प्रथम ईश्वरवादी व्हावें लागतें. हा विचार असो. संक्षेपानें ह्या सर्व धर्मांचा असा विचार करितां येईल. अदृष्ट व वासना धर्मानें उत्पन्न होत असतात, हें आम्हीं मागें सांगितलें आहे. अदृष्ट बाह्य चिन्हानें उत्पन्न होत असून, नीति वगैरे अंतश्चिन्हानें वासना उत्पन्न होत असतात. देहाश्रित धर्मानें बहुशः अदृष्ट होत असतें व अंतःकरणाश्रित धर्मानें बहुशः वासना होत असतात. हा क्षुल्लक आणि साधारण असा नियम आहे. ह्याचें मुख्य तत्व तर अंतःकरणाच्या तीव्र गुणसंक्रमणांत आणि तीव्र क्रियेंत आहे. आत्मा शुद्ध, बुद्ध, नित्य, मुक्त आहे. कांहीं धर्मांत देहचिन्हें उत्तम आहेत, व अंतःकरणचिन्हें मलिन आहेत. त्याचें अंतःकरणचिन्ह उत्तम केलें पाहिजे. कांहीं धर्मांत अंतःकरणचिन्ह उत्तम आहे, तर देहचिन्हें मलिन आहेत. कोठें निरात्मवाद आहे तर कोठें संशयवाद आहे. ह्या सर्व धर्मांची एकता ईश्वरप्रातिनिष्ठारूपानें एका श्लोकानें आर्यमहात्म्यांनीं केली आहे. तो श्लोक हाः—

> यं शैवाः समुपासते शिव इति ब्रह्मेति वेदांतिनो
> बौद्धा बुद्ध इति प्रमाणपटवः कर्तेति नैय्यायिकाः ।
> अर्हन्नित्यथ जैनशासनरताः कर्मेति मीमांसकाः
> सोऽयं वो विदधातु वांछितफलं त्रैलोक्यनाथो हरिः ॥

ह्यांत वैदिक-अवैदिक मतांचा समन्वय झाला आहे. अर्थ स्पष्ट आहे. बौद्धांतील अंतःकरणचिन्हें उत्तम आहेत, परंतु निरात्मवाद व निरीश्वरवाद ह्या दोन कारणांमुळें वैदिक धर्माशीं त्याचा भेद आहे. जैनांत शून्यवादाचा व

वेदांतांतील ब्रह्मवादाचा थोडासा समन्वय योगवासिष्ठकारांनीं केला आहे.

**वादी**—वेदांती लोक आपल्या दृष्टीनें सर्वांचाच समन्वय करून घेतात, परंतु ते ते धर्मवेत्ते मानतात काय ?

**सिद्धान्ती**—कांहीं विचारी मानतातच. कथासरित्सागरांत नागार्जुन हे भगवान् बुद्धाच्या गतीला गेले असें स्पष्ट म्हटलें आहे.

**अकार्यं मा कृथा राजन्न शोच्यो ह्येष ते सखा ।**
**नागार्जुनोऽपुनर्जन्मा गतो बुद्धसमां गतिम् ॥ ५३ ॥**

( रत्नप्रभालंबकतरंग ७ )

ह्या बौद्ध नागार्जुनानें देखील शून्यवादाचा व वेदांतांतील ब्रह्मवादाच समन्वय थोडासा मानला आहे.

**सर्वालंबनधर्मैश्च सर्वतत्त्वैरशेषतः ।**
**सर्वक्लेशाशये शून्यं न शून्यं परमार्थतः ॥[1]**

( अर्थ स्पष्ट ) याप्रमाणें नागार्जुनाचें म्हणणें असून "आलोकमालकार" बौद्धाचेंही म्हणणें असेंच आहे.

**विरुद्धत्वात्तमोवृत्तेर्नावकाशं ददाति या ।**
**साऽवस्था काप्यविज्ञेया मादृशा शून्यतोच्यते ॥ १ ॥**
**न पुनर्लोकरूढ्येव नास्तिक्यार्थानुपातिनी ।**

( अर्थ स्पष्ट. ) भगवान् बुद्धानें एकाच तत्वाचा बोध केला असून शिष्यांच्या बुद्धिभेदामुळें त्याचे चार प्रकार झाले, असें स्वामी विद्यारण्य सर्वदर्शनसंग्रहांत म्हणतात. बुद्धानें जो धम्मपदादि ग्रंथांत नीतिबोध केला आहे, तो संपूर्ण आर्यधर्मांत पूर्वीच संग्रहीत आहे, असा पंक्त्यनुसार मेळ पाडून देखील दाखविणें शक्य आहे. ह्याप्रमाणें जैनधर्माच्या "समयसारांत" वेदांताच्या ब्रह्माचा समन्वय झाला आहे.

" उदयति न नयश्रीरस्तमेति प्रमाणं ।

---

१ [illegible]दीपिकेंत नागार्जुनाच्या ग्रंथांतून घेतलेला श्लोक.

क्वचिदपि च न विद्मो याति निक्षेपचक्रम् ॥
किमपरमभिदध्मो धाम्नि सर्वंकषेऽस्मि-
न्ननुभवमुपयाते भाति न द्वैतमेव ॥"

ह्याचा स्पष्ट अर्थ मला ठाऊक आहे, परंतु तो करून देण्यास जैनशास्त्रांचें नय-निक्षेप इत्यादि पदार्थांचें ज्ञान करून द्यावें लागेल. त्यानें ग्रंथ फार वाढेल. म्हणून 'समाधींत आत्मप्रत्यय असून द्वैत कांहीं भासत नाहीं' एवढा भावार्थच सांगतों. पूर्वी म्लेच्छराजानें पाळलेले भागवत धर्म जर कोणी पाळील, तर तो याच जन्मांत आमचा उपदिष्ट होण्यास पात्र होईल. ईशपुत्रधर्माला भविष्यपुराणांतील न्यूहाचाराच्या द्वारानेंही उत्तम गति आहे. बौद्धांनीं बुद्धाला विष्णूचा अवतार समजलें पाहिजे. त्याविषयीं मेरुतंत्रांत असें सांगितलें आहे—

अथातः संप्रवक्ष्यामि बौद्धमंत्रं महाफलम् ।
सभ्यत्वान्न द्विजातीनामधिकारोऽस्ति कर्हिचित् ॥१३१४॥
वाममार्गरता विप्रा कुंडका जातिविच्युताः ।
हीना वैदिकसंस्कारैः प्रमादान्म्लेच्छतां गताः ।
गोलकाश्च तथा जात्या कायस्थादय एव च ॥ १३१५ ॥
बौद्धं विष्णुं समारभ्य भुक्तिं मुक्तिं प्रयान्ति ते ।
पतितानामयं मंत्रः संप्रोक्तः शरणप्रदः ॥ १३१६ ॥
नमो भगवते बुद्ध संसारार्णवतारक ।
कलिकालादहं भीतः शरण्यं शरणं गतः ॥ १३१७ ॥
आद्यैः पदैश्चतुर्भिश्च चरणद्वितयेन च ।
षडंगविधिराख्यातः सर्वेण व्यापकं चरेत् ॥ १३१८ ॥
पद्मे पद्मासनस्थं च ऊर्वोर्न्यस्तकरद्वयम् ।
गौरं मुंडितसर्वांगं ध्यानस्तिमितलोचनम् ॥ १३१९ ॥
पुस्तकासक्तहस्तैश्च नानाशिष्यैश्च शोभितम् ।
इंद्रादिलोकपालैश्च ताम्रवर्णाम्बरावृतम् ॥ १३२० ॥

एवं ध्यात्वा यजेत्पद्मे द्वात्रिंशद्दलसम्मिते ।
कर्णिकायां षडंगानि दले शिष्यान्यजेत्क्रमात् ॥ १३२१ ॥
मीनांकं ललितां वीरं योगिनीं ज्ञानदायिनीम् ।
सर्वज्ञं सुगतं बुद्धं पार्श्वनाथं तथागतम् ॥ १३२२ ॥
चार्वाकं धर्मराजं च जिनं पद्मावतीं तथा ।
कामिनीं च महामायां श्रीकृष्णं च विनायकम् ॥ १३२३ ॥
समन्तभद्रं वर्त्मार्षिं निधिचंद्रं मनोहरम् ।
षडभिज्ञं दशबलं शास्तारं श्रीधनं क्षयम् ॥ १३२४ ॥
दंडिनं मुंडिनं कान्तं श्रावकं लोकपोषणम् ।
तद्बाह्ये भूपुरे दिक्दान्तदस्त्राणि च पूजयेत् ॥ १३२५ ॥
वर्णलक्षं जपेन्मंत्री होमयेच्च घृतौदनम् ।
तुलसीमिश्रतोयैश्च भगवंतं प्रतर्पयेत् ॥ १३२६ ॥
परस्य दुःखकरणं मनसापि न चाचरेत् ।
एवं तु वर्तमानस्य वाक्सिद्धयादि प्रजायते ॥ १३२७ ॥
राजानो वशगास्तस्य नाशं यान्ति ह्युपद्रवाः ।
भूतप्रेतादिपीडायां महागदभये तथा ॥ १३२८ ॥

( मेरुतंत्रप्रकाश २६ )

ह्या सर्व श्लोकांचें रहस्य इतकेंच आहे कीं, सकाम पुरुषानें बुद्धाचें सपरिवार पूजन करावें, निष्काम बौद्धानें केवळ हा मंत्रच जपावा, व बुद्धाचे ठिकाणीं विष्णुभावना करावी. आम्हीही बुद्धाला देव समजून नमस्कार करितों, तसा बौद्धही करतील तर या जन्मीं ते भागवत असून जन्मांतरीं ते पूर्ण भागवत होतील. वाममार्गी[1] लोकांनांही बौद्धमार्गानेंच जी गति सांगितली आहे, त्याचें कारण त्यांत अंतःकरणधर्म उत्तम आहेच हेंच आहे. यद्यपि बौद्धमार्गापेक्षां वाममार्गाला आर्य थोडेंसें विशेष मानतात, याचें कारण तत्-

---

१ शाक्तपंथी.

ज्ञानदृष्टीनें तो निरात्मवादाइतका किंवा स्याद्वादाइतका[1] वेदांशीं विरुद्ध नाहीं, परंतु आचारदृष्टीनें बौद्धाचारच त्यापेक्षां उत्तम आहे असें मी म्हणतों. कारण,

मद्यं मांसं च मीनं च मुद्रा मैथुनमेव च ।
एते पंच मकारा स्युर्मोक्षदा हि युगे युगे ॥

इत्यादि भयंकर प्रकार बौद्धधर्मांत नाहींत. बौद्धांना जर आर्यधर्मांत येण्यास जन्मान्तर लागेल असें कोणास म्हणणें असेल, तर वाममार्गीयांनाही तें लागलेंच पाहिजे असें मी म्हणतों. यवनमताचा व आर्यमताचा समन्वय करण्याचा प्रयत्न पंजाबांत नानकानें, हिंदुस्थानांत कबिरानें व महाराष्ट्रांत शेख-महम्मद यांनीं केलेला आहे तो असा--

राम रहिमा करिमा केशव अलख नाम सब एकहि है ॥
जिसको तुम बिसमिल्ला कहते वोहि विष्णु हमारा है ॥१॥

( कबीर )

हकला इलाहा इल्लल्ला । हजरत महम्मद रसुलल्ला ॥
या दोहों चरणांत पाहिजे ओळखिला । ईश्वर विश्वरूपें ॥६६॥
लाइला याची टीका अवधारा । नामरूपावेगळा ईश्वर स्मरा ॥
तेणें शीघ्र भवनदीचा फेरा । चुकेल बापा ॥६७॥
मुसलमान कहे जिकिर बुखानद । मऱ्हाटे म्हणती कथेचा आनंद ॥
परि दोहीं भाषांचा भेद । ईश्वर अल्ला जाणे ॥६८॥
ईश्वर म्हणजे विश्वंभर । दगडाचा नोहे ओळखा जाहीर ॥
ज्यापासून असंख्य अवतार । रामकृष्णादि जन्मले ॥६९॥
अल्ला म्हणजे आलिफ न्यारा । वाहनही निशिदिनीं अवधारा ॥
एकला एक जीवका प्यारा । गुफर रहिम ॥७०॥

( शेखमहम्मदकृत योगसंग्राम, प्रसंग १८ )

याप्रमाणें कर्मपंथानें येण्याकरितां अदृष्टकारणत्वामुळेंच जन्मान्तराचेंच इत-

---

१ आत्मा असेल असा संभव आहे, हें मत.

रांना येतां येतें. भक्तिपंथांत तत्त्व मान्य करील तर कोणालाही येण्याचा अधिकार आहे. विश्वामित्राप्रमाणें तीव्र तप करून ब्राह्मण्य जसें याच जन्मांत मिळविणें सुलभ आहे, त्यापेक्षां तीव्र भगवद्भक्ति करून

## याच जन्मांत ईश्वर मिळवणें

अधिक सुलभ आहे. कारण तपानें ब्राह्मणपणा मिळविण्यास योगसूत्रांत सांगितल्याप्रमाणें जात्यंतरपरिणामाची जशी आवश्यकता आहे, तशी ईश्वर मिळविण्यास नाहीं. जेवण्याचा व लग्नाचा मात्र आग्रह करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. कारण त्याला क्रमिक सात्विक अदृष्टाची आवश्यकता आहे. गुणकर्मवर्णपक्षांत कांहीं हा विचार करण्याची आवश्यकता नाहीं. तें कांहींही असो. व्यर्थ जन्मवर्णपक्षाचा चित्तक्षोभ करण्यांतही कांहीं अर्थ नाहीं. शिवाय ज्यांना कर्मवाद मान्य आहे, त्यांना अदृष्टजन्य जात्यधिकार मान्य असलाच पाहिजे, पण गुणकर्मवादाचींही शास्त्रांत वाक्यें असल्यामुळें तोही असूं शकतो. आम्ही ' वर्णकुसुमांत ' तातांच्या वाक्यावरून जो जन्मपर निर्णय दिला आहे; त्याच वाक्यांचा अर्थ गुणकर्मपरही करतां येतो; परंतु ह्या संशयांत आम्हांला शिरून कांहीं करावयाचें नाहीं. गुण हे सत्य आहेतच व अदृष्टाप्रमाणें जन्म होतोच, तेव्हां

## आर्यलोक कोणाच्या हातचें जेवीत नाहींत

तर दुसऱ्यानें पाहिजे असल्यास त्यांच्या हातचें जेवूं नये ! परंतु हठानें मात्र आर्यांना जेवावयास लावण्यांत कांहीं अर्थ नाहीं. ह्यांत उच्चनीचतेचा किंवा द्वेषाचा मुळींच भाग नाहीं. केवळ धर्माची आज्ञाच तशी आहे. जातिवादानेंच आम्ही दुसऱ्याला आपल्या जातींत जबरदस्तीनें घेत नाहीं. याचें कारण उच्चनीचभाव किंवा द्वेष नसून ज्या ज्या धर्मांचे जे जे लोक असतील त्यांनी त्यांनी आपला धर्मच तीव्रश्रद्धेनें पाळावा, म्हणजे जन्मांतरीं किंवा स्वर्गांत त्या सर्वांचा मेळ होईल. आज एक व उद्यां दुसरा अशा प्रकारचें धर्मांवर करीत आहे. कोणत्याच धर्मावर जर तीव्र श्रद्धा नसेल, व सर्वच धर्मांवर मृदु

श्रद्धा असेल तरी त्यानें आपापल्या धर्मांतच राहावें असें आम्ही म्हणतों; परंतु इतकेंच कीं, जसें आम्ही कोणाचा धर्म मोडण्याची मनानेंही इच्छा करीत नाहीं, त्याप्रमाणें आमचाही धर्म मोडण्याची कोणीं इच्छा करूं नये एवढीच विनंती आहे. आतां ज्यांची इतर सर्व मतावर मृदु श्रद्धा असून, आमच्या उपदेशानें भागवत धर्मावर तीव्र श्रद्धा होईल, त्यांनीं भोजनादि स्थानीं ऐक्य न करितां भजनादि स्थानीं खुशाल आमच्याशीं ऐक्य करावें; व भोजनादि स्थानीं ऐक्य करण्याचा आग्रह असल्यास जगन्नाथप्रसादाविषयीं थोडासा असूं शकतो. वर्णांचें तत्व कोणतेंही असलें तरी व्यर्थ समाजक्षोभ करण्याची आमची इच्छा नाहीं. याप्रमाणें प्राचीन आर्यमतास अनुसरून सर्व धर्मांचा हा समन्वित विचार मी केला आहे. आतां सर्वथा स्वमागाचा व स्वाहंकाराचा परित्याग करून, तीव्र-भक्तानें सर्वच भगवंताला अर्पण करील, तर कोणतेंही कर्म भागवतधर्मांत अंतर्भूत होतें हें आम्हीं वारंवार प्रतिपादिलेंच आहे.

आतां कोणी मग असें म्हणेल कीं, तुम्ही सर्व धर्मांना आपल्याकडे ओढूं पाहतां, तसे त्या धर्मांत कां जात नाहीं? तर आम्ही कोणाला ओढीत नाहीं हें आतांच सांगितलें आहे; व आमच्या धर्मांत सर्व धर्मांचीं[1] तत्वें संकलित झालीं असल्यामुळें, तीं सर्व आम्हांला प्राप्तच आहेत, त्यामुळें कोणापासून समजून घेण्याचीही अपेक्षा नाहीं.

## ' पुराणें क्षेपक ' याचें खंडण

**वादीः**—अहो ! एवढा समन्वय केला त्यापेक्षां पुराणादिकांना क्षेपक[2] मानलें असतें म्हणजे झालें असतें.

**सिद्धान्तीः**—तशानें ज्याला जें आवडत नाहीं तें तो क्षेपक मानील व मोठी अव्यवस्था होईल. जरी पुराणादि ग्रंथांत कोठें कोठें क्षेपकाभास होतो, त्याचा कार्यकारणविचारानें समन्वय होत असल्यामुळें व ते पुराणऋषि आणि

१ आर्यधर्माची महती यांतच आहे. २ इतरांनीं भेसळ केलेले असे भाग.

आचार्य दिव्यदृष्ट्यादिसामर्थ्येंकरून अस्मद्विशिष्ट[1] असल्यामुळें त्यांच्या वाक्याचें तात्पर्यच आम्हांला मान्य आहे. परंतु आम्हांला विचारांत असणाऱ्या आमच्या-पेक्षांही न्यून दिसत असणाऱ्या तुझ्यासारख्या वादीचा क्षेपकवाद घेऊन आम्हीं आपली स्वधर्मनिष्ठा कां दवडावी? हेंच श्रीशांकरमताचें सहिष्णुत्व आहे; व त्याच मताचे आम्ही भागवत आहोंत. " मुक्ता अपि लीलया विग्रहं कृत्वा भजन्ते " इत्यादि वाक्यांनीं त्यांनीं मधुराद्वैत गुप्तरूपानें दाखविलें असल्यामुळें श्रीभगवत्पूज्यपादचरणाचा वियोग निमिषभर सहन करण्याची आम्ही इच्छा करीत नाहीं. यद्यपि भविष्यपुराणांत

रामानुजांनीं शंकराचार्यांना जिंकिलें

असें आहे; तथापि तें ज्ञानपक्षांत नसून उपासनापक्षांत लिहिलें आहे. तेव्हां उपासनेची प्रशंसाच त्या आख्यायिकेचा अर्थ आहे; किंवा अन्यकल्पांतील ती कथा आहे. या कल्पांतील शंकराचार्य व रामानुजांच्या ऐतीह्य काळांचा मेळ नाहीं. भविष्योत्तरपुराण वाचून पाहिल्यास अनेक कलियुगांची माहिती एकदम दिली आहे असें दिसून येईल, व महाभारतांतर्गत शांतिपर्वांतील मोक्षधर्म वाचून पाहिल्यास व्यासांना मागच्या पुढच्या हजारों कल्पांचें ज्ञान आहे हें दिसून येईल. तेव्हां भलत्याच एखाद्या शंकराचार्यांचा व रामानुजांचा वाद भविष्यपुराणांत सांगितला आहे असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. किंवा शिवविष्णुपुराणांची परस्परनिंदा जशी विधेयस्तुत्यर्थ आहे, त्याचप्रमाणें शंकराचार्य शंकराचा अवतार प्रसिद्ध असून, रामानुजही शंकराचाच अवतार असें भविष्यपुराणांत सांगितलें आहे. तेव्हां आपलाच आपण शिष्य व आपलाच आपण गुरु, आपल्यांतच आपली जीत व आपल्यांतच आपली हार ती काय होणार! महादेवाला आपलें सामर्थ्य दाखवावें म्हणून योगिनींनीं पार्वतीला [illegible] देऊन तिला शिजवून महादेवाला खाऊं घातलें अशी कथा वासिष्ठांत आहे.

अस्मानुमापतिर्देवः किं पश्यत्यवहेलया ॥ २७ ॥

१ आमच्याहून

प्रभावं दर्शयामोऽस्य पुनर्नास्मांस्त्वसौ यथा ।
दृष्टमात्रमहाशक्तिः करिष्यत्यवधीरणम् ॥ २८ ॥
इति निश्चित्य ता देव्यो विवर्णवदनांकिताम् ।
उमामेव वशीकृत्य प्रोक्षयामासुरादृताः ॥ २९ ॥

( योगवा. निर्वाणप्रकरण पूर्वार्ध अध्यायं १८ )

ददुरोदनतां यातामीश्वराय प्रियामुमाम् ॥
भोजनाय महामाया देव्यस्ताः शूलपाणये ॥ ७ ॥

( निर्वाणप्रकरण अध्याय १९ )

आपला आपल्यांत शाप संभवनीय नाहीं, म्हणून ही केवळ शक्तीची लीला आहे असा आशय मूळकारांनीं व टीकाकारांनीं तेथेंच दाखविला आहे. याप्रमाणें रामानुज व शंकराचार्य दोघेही एकाचेच अवतार असल्यामुळें ही केवळ त्यांची लीला होय असें मी म्हणतों. पुन्हा त्यांचा जो वाद झाला आहे, तो सर्वशास्त्रांमध्यें शिव श्रेष्ठ आहे कीं विष्णु श्रेष्ठ आहे अशा प्रकारचा झाला आहे; विशिष्टाद्वैत व केवलाद्वैत यांविषयीं त्यांत चकार शब्द देखील नाहीं. ह्याविषयीं माझ्या म्हणण्याची सत्यता पटण्याकरितां भविष्यपुराणान्तर्गत प्रतिसर्गपर्वाच्या चतुर्युगखंडांतील चतुर्थखंडाच्या चौदाव्या अध्यायांतील श्लोक ८९ पासून १२३ श्लोकांपर्यंत विषय पहावा. ग्रंथविस्तारभयास्तव मी येथें लिहीत नाहीं. आतां कोणी आग्रहच करील तर त्यालाही माझा असा आग्रह आहे कीं, हे शंकराचार्य तरी कोणी शैव असतील, किंवा रामानुज तरी निराळे असतील. कारण आमच्या शंकराचार्यांनीं शैवांलाही जिंकिलें होतें, अशी शांकरदिग्विजयांत कथा आहे, व रामानुज हे शेषाचे अवतार होते असें विशिष्टाद्वैतवादी लोकांच्या प्रपन्नामृतांत म्हटलें आहे. तेव्हां आग्रहानें म्हण किंवा अनाग्रहानें म्हण, भविष्यपुराणाच्या वादाशीं व केवलाद्वैतविशिष्टाद्वैतवादाशीं कांहीं संबंध नाहीं. म्हणूनच तुम्ही दुसऱ्याच्या मतांत कां जात नाहीं, या तुझ्या विचाऱ्यांत रामानुजमताचा आम्हीं स्वीकार करावा असें जें इंगित होतें, तें अर्थातच

ह्या उत्तरानें तुला सोडून दिलें पाहिजे.

ह्याप्रमाणें वादीनें शिष्यत्वाला प्राप्त होऊन थोडें मौन धरिलें असतां सिद्धान्ती म्हणतात, प्रथमपासून या २० व्या कुसुमांत* प्राचीन आर्यग्रंथांना अनुसरून सर्व जगांतील धर्मांचा व आर्यधर्मांतील अंगांचा समन्वयपूर्वक व अभीष्टतापूर्वक तावदत्त[1] स्फूर्त्यनुसार, किंवा ती संपूर्ण स्फूर्ति हृदयांत साठवितां आली नसल्यास यथाशक्ति म्हणा, मीं संपूर्ण विचार केला आहे. मनुष्य नित्य चुकीला पात्र आहे. श्रुतिविरुद्ध स्मृति देखील प्रमाण होऊं शकत नाहीं, तेथें माझें वाक्य प्रमाणच झालें पाहिजे असें मी कोण्या तोंडानें म्हणूं ? परंतु मला माहीत नाहींत अशा वासुदेवानंदादि कांहीं महात्म्यांवांचून दुसऱ्या सर्वांविषयीं स्वामी तुलसीदास महाराजांनीं म्हटलेलें वचन मी येथें लिहून ठेवतों.

**यहि पै जो कोइ करि है शंका । सो मोहिते अति जडमति रंका ॥**

## स्वसंप्रदायविशेष

**ओव्याः**—आतां स्वसंप्रदायविशेष । पूर्वार्धांतीं सांगूं सुरस । कीं नियम इच्छिणारास । पुढील गती ॥ ४०९ ॥ वचन यथाशक्ति अनुकरावें[2] । ग्रंथ-वचन अप्रमाण न धरावें[3] । पांडित्य तरी परिहरावे । असले विरोध[4] ॥ ४१० ॥ धर्मद्वेष करूं नये । धर्मांतर करूं नये । समाजक्षोभ करूं नये[5] कांहीं केल्या ॥४११॥ अहमनधिकारिणि[6] कूटार्थोपदेष्टा[7] स्यामिति । प्रतिज्ञा करावी गुरुआज्ञापुरती । कूटार्थोपदेशरीती । तीही सांगूं ॥ ४१२ ॥ जैसें कां कलिमल । भलते मागती वेदोक्त । तैं तयांसी निश्चित । ऐसें म्हणावें ॥ ४१३ ॥ ते म्हणती आम्ही ब्राह्मण । तयां म्हणावें तुम्ही साचचि ब्राह्मण । कल्पादी कृतयुगीं ब्राह्मण । सर्वचि होते भारतवचनीं ॥ ४१४ परि तुमचा संस्कार-

---

१ श्रीज्ञानेश्वरांनीं दिलेल्या. २ ग्रंथवचनांप्रमाणेंच वागावें. ३ ग्रंथवचन मिथ्या म्हणूं नये. ४ पांडित्य अंगीं असल्यास, त्यायोगें असलेले विरोध टाळावे. ५ जातिभेद मोडण्याच्या नादानें. ६ अनधिकाऱ्यास. ७ कूटार्थ [illegible] पुढेंच दिला आहे. * अध्यायांत.

लोप झाला । प्रायश्चित केलें पाहिजे तयाला । यास्तव थोडासा संस्कार जयां- मध्यें उरला । त्यांचाची पक्ष उचलावा ॥ ४१५ ॥ पतित झालिया वह्निनी । सर्व कुळ सांडिती काय कोणी । तेवि ससंस्कार पतित असलिया मनीं । तरि व्यक्तिद्वेषें जातिद्वेष न करावा ॥ ४१६ ॥ आपणाचे संस्कार सोडिले । या- करितां पाहिजे प्रायश्चित केलें । त्यामाजीं पाहिजे आणिलें । गुणाचि आधीं ॥ ४१७ ॥ म्हणोनि व्यक्तिद्वेषें ब्राह्मण्य न दूषावें । प्रथम एवढेंचि करावें । इत्यादि वचनीं चालतां रें । लिंगधारण[1] न करितां ॥ ४१८ ॥ हा सर्वथा कूट उपदेश नाहीं । परि अर्धकूट[2] पाही । ऐसेंचि मेरस्यादी लवलाही । करावें सकळ ॥ ४१९ ॥ रोगी आणि म्हातारा । नपुंसक तिसरा । चवथा समा- धिस्थ बरा । हिमालयस्थ मात्र ॥ ४२० ॥ हे चवघे वेगळे करोनी । सर्व माझिया संप्रदायजनीं । विवाह करावा निश्चयें करोनी । संन्यास कदा घेऊं नये ॥४२१॥ जयास वाटे ब्रह्मचर्य पाळावें । त्यानेंही लग्नचि करावें । अपत्य झालि- याही असावें । वृद्ध तोंवरी स्त्रीसवेंचि ॥४२२॥ स्त्रीगमन असूं द्यावें अधीन । परि न रहावें स्त्रियेविण । चित्ताचा विश्वास धरून । मत्संप्रदायिकीं वागूं नये ॥ ४२३ ॥ प्रयत्नाचा विश्वास धरावा । परि मनाचा विश्वास न करावा । मजविषयींही पाळावा । हाचि नियम ॥ ४२४ ॥ मीही प्रवर्तलिया परस्त्री- गमनीं । तरी निरोधावें मजलागोनी । परि जाऊं नये सोडोनी । मम मार्गातें ॥ ४२५ ॥ गोरक्षें मत्स्येंद्रा पद्मिनीपासूनि सोडविलें । परि नाथसंप्रदाया नाहीं त्यजिलें । तैसे मियांही विपरीत केलें । तरी मज दंडावें मत्संप्रदायिकीं ॥ ४२६ ॥ संप्रदायिक कोणी चुकतां । तरी माझा दंड साहावा सर्वथा । एवं गुरुशिष्यव्यवस्था । पुढेंही क्रमावी ॥ ४२७ ॥ परि सोडूं नये संप्रदाय । श्रद्धानाश दुःखद होय । चित्त रक्षायाची धरावी सोय[3] । हा निश्चय सांगतों मी ॥ ४२८ ॥ मज पूर्वीं स्त्रीगमनादि पापें घडलेंतीं । हें स्मरोनि सांगतों

१ भस्मादि चिन्हें, ब्राह्मण्याचीं. २ थोडासा गूढार्थाचा. ३ संप्रदाय हें चित्त आवरण्याचें एक साधन आहे.

तातांप्रति । परि पुढें न घडावेत हा चित्तीं । निश्चयही आहे ॥ ४२९ ॥ हें नाहीं सांगत निरहंकार होवोनि । सांगत आहे चित्ताची कहाणी । म्हणोनि सावध रहावें सकळांनीं । मजविषयीं स्त्रियांनीं विश्वासू नये ॥ ४३० ॥ एवं विश्वास न धरावा । परि मार्गही न सोडावा । कारण संप्रदाय माझा बरवा । श्रीकृष्णभक्तिवर्धक ॥४३१॥

परस्त्रीतें म्हणतां माता । चित्त लाजवितें चित्ता ॥१॥
काय बोलोनिया तोंडें । मनामाजी कानकोंडें ॥२॥
धर्मधारिष्ट गोष्टी सांगे । उष्ट्या हातें नुडवी काग[1] ॥३॥
जें जें कर्म वसे अंगीं । तें तें आठवे प्रसंगीं ॥४॥
बोले तैसा चाले । तुका म्हणे ते अमोल ॥५॥

( तुकारामगाथा अ० ३०६० )

या अभंगांतील बहुतेक पहिलें । चरण माझेठायीं सत्यत्वा आलें । आतां प्रक्रिया यांतुनि जे बोलें[2] । ते आणिजे ध्यानीं ॥ ४३२ ॥ जयांची माझेठायीं वात्सल्यभक्ति । तिहीं कुमार्गी जातां निरोधावें मजप्रति । आणिक कुमार्गीं जातां निश्चितीं । निरोधीन मीही तयां ॥ ४३३ ॥ या रोधारोधींत शिष्य वा गुरु मरो । किंवा जग हें आघवें सुधरो । परि संप्रदाय सदा अनुकरो । मज-सहित ममानुयायी जन ॥ ४३४ ॥ मनुष्यांमाजीं पाहतां । मज सत्यचि नाहीं कोणी शिकविता । ग्रंथ वाचवोनि[3] तत्वतां । लिहिला अर्थ हेंही सत्य ॥ ४३५ ॥ परंतु अचाट माझी बुद्धि । वाचकांसही[4] न कळे जो विधि । तो आकळूनिया आधीं । समन्वयीं ठाके ॥ ४३६ ॥ कांहीं अधीतही[5] वाचक मज मिळाले । मजपरीस संस्कृत शिकले । परि तिहीं वाचितां, अर्थ सांगितले । निर्भ्रम म्यांचि तद्ग्रंथींचे ॥ ४३७ ॥ एवढाचि मज ग्रंथीं विशेष । एरव्हीं वाचकोपकार निःशेष । संशय राहूं नये कवणास । यास्तव

१ कावळा. २ मी बोलतों. ३ लोकांकडून वाचून घेऊन. ४ स्वतः ग्रंथ वाचणारास. ५ विद्वान्.

तात स्मरोनि लिहिलें हें ॥ ४३८ ॥ रूपावळीची पूर्ण विभाक्ति । गुरुपदसाक्ष ठाउकें नाहीं मजप्रति । परि महाभाष्यांतीलही[1] विरोधाविरोधगति । महाराष्ट्रभाषेंत सांगूं शकें ॥ ४३९ ॥ ही मज मति कैसी मिळाली । ते तातकरणी[2] तातांसाचि भली । बहु काय, जिहीं मज किंचित् विद्या शिकविली । तेही म्यां शिष्य केले स्वबुद्धीनें ॥ ४४० ॥ धर्मविचाराच्या ठायीं । मज भ्रम नुपजे सर्वथा कांहीं । गुणदोषविचार महंतांचाही[3] । सत्यवतीकुमरासम[4] पुढें ठाके ॥ ४४१ ॥ मनुष्यांत जे जे गुरु केले । तेथ माझें समाधान नाहीं झालें । चतुरक्षरी[5] देऊनि अंगिकारिलें । तातें, एवढें मात्र सत्य ॥ ४४२ ॥ इतुका उनाड असूनि पोटीं । तातें अंगिकारिलें शेवटीं । येणेंचि विश्वास हृदयसंपुटीं । कीं मधुराद्वैत चालवील प्रभु ॥ ४४३ ॥ जो गलितकुष्टें प्रवर्तला आत्मघाता । तयासी अश्विनीकुमार भेटले अवचिता । तरी कोण न अनुमानील चित्ता । कीं ययाचा झाला आतां अभ्युदय ? ॥ ४४४ ॥ तैसे माझे अपराध अनंत । परि शेवटीं उपदेशी तात । येणेंचि विश्वासिलें चित्त । मधुराद्वैत अक्षय माझें ॥ ४४५ ॥ वाचकीं वाचूनि दाखविलें । गुरुकृपाबुद्धि म्यां अर्थ लिहिले । म्हणूनि अप्रमाण झाले । न म्हणावे कोणी ॥ ४४६ ॥ श्रीतुकारामाचीही ऐसीच उक्ति । ते प्रमाण सांगूं श्रोतयांप्रति । सावधान होवोनि चित्तीं । अभंगरीती ऐकावी ॥ ४४७ ॥

* " संवसारें जालों अतिदुःखें दुःखी । मायबाप सेखीं क्रमिलीया ॥ कांहीं पाठ केलीं संतांचीं उत्तरें । विश्वासें आदरें करोनिया ॥ सत्यअसत्यासी मन केलें ग्वाही । मानियलें नाहीं बहुमत ॥ मानियेला स्वप्नीं गुरूचा उपदेश । धरिला विश्वास दृढ नामीं ॥ यावरी या झाली कवित्वाची स्फूर्ति । पाय धरिले चित्तीं विठोबाचे ॥ निषेधाचा कांहीं पडला आघात । तेणें मध्यें चित्त दुखविलें ॥ " इत्यादि असलेल्या तुकाराममहाराजांच्या गोष्टी

१ शांकरभाष्यांतील. २ श्रीज्ञानेश्वरांच्या कृपेचें फळ. ३ मोठमोठ्यांच्याही चुका. ४ व्यासांप्रमाणें. ५ मंत्र. * ( तुकारामगाथा ४०४९ )

व माझी स्थिति समान आहे, परंतु मी तुकाराममहाराजांसारखा महात्मा नाहीं. तथापि तुकाराममहाराजांच्या चरणरजाच्या लक्षांशाइतकी तरी माझी कविता प्रमाण आहे. ज्याला तो रजाचा लक्षांश प्रमाण आहे, त्याला माझी कविताही प्रमाण असलीच पाहिजे. थोडीशी काहीं त्यांना संतांची उत्तरें पाठ केलीं होतीं, मीही काहीं जणांकडून वाचून घेतलें. या दिग्दर्शनावरून माझ्या स्थितीचें अनुमान करावें. बुद्धिस्वातंत्र्य त्यांनाही आहे. याप्रमाणें माझी पारमार्थिक व सांसारिक स्थिति आहे. त्यांत मागें झालेल्या सांसारिक चुकांचीही सर्वांनीं क्षमा करावी. कांहीं कारणामुळें प्रतिनिधीच्या कोठून व्यवहारी भाषा शिकण्याचा प्रसंग आल्यास त्या शिकविण्याच्यानें संप्रदायभंजक होऊं नये. उलटा व्यवहार जसा आपण अर्पण केला आहे, त्याप्रमाणें व्यावहारिक विद्याही अर्पण केल्या आहेत असें समजावें. किंवा अभिमान सुटतच नसल्यास "अथवा विषया विद्या" अशी तरी कल्पना करावी. चांगदेव ज्यांच्यापासून प्रथम योगादिक शिकले, तेच गुरु पुढें त्यांचे शिष्य झाले. याचा विशेष विचार उत्तरार्धांत दीक्षासमयीं गुरुशिष्यनिर्णयांत करीन.

## सांप्रदायिकांनीं कसें वागावें ?

**ओव्या**—मागें जाहले ते गेले । पुढें मज सांप्रदायिकीं पाहिजे सांभाळिलें । आणि मियांही तयांसी रक्षिलें । पाहिजे प्रसंगें ॥ ४४८ ॥ अथवा ताताांवरी विश्वास । मी ठेवून राही एकांतास । जनीं परी संप्रदायास । प्रेरावें। सज्जनीं ॥ ४४९ ॥ वाटेल तो करावा यत्न । शक्य तितुकें करावें धेनुपालन न होईल तरी मासीं पण[1] । धेनुरक्षणसमाजा[2] देत जावा ॥ ४५० ॥ अथवा [illegible] देवडें । अवश्य देयावें फुडे । जेवणापूर्वीं रोकडें । धेनुग्रास द्यावें ॥ ४५१ ॥ संस्कृतभाषाशास्त्रपंडित । बुद्धीविण वाद करूं नये किंचित् । [illegible] सुलभ कळेल अर्थ । ऐसें कीजे ॥ ४५२ ॥ माझें ऐसें आहे मत । कीं समान[3] मूर्ख आणि पंडित । एक ब्रह्मज्ञानी मात्र विशेषत । अथवा

1 [illegible]. 2 गोरक्षणकार्यास. 3 'समान' पाहिजे वाटतें.

बोधी ॥ ४५३ ॥ [illegible]पट निघतें म्हणून । अग्नि आहे हें म्हणती स्त्रियाही आपण । आणि ‘ पर्वतो वन्हिमान् धूमत्वात् ’ हें पंडितांचें वचन । यांत विशेष काय ? ॥ ४५४ ॥ जो ब्रह्मज्ञानी झाला । जेणें षड्रिपुसमुदाय रोधिला । तोचि एक विद्वान [illegible] । [illegible] ते मूर्ख ॥ ४५५ ॥ केवळ शब्दमात्र पाठ म्हणती । आणि अर्थ [illegible] सर्वथा नेणती । ऐसा चतुर्मासी मजप्रति । पडला प्रसंग ॥४५६॥ [illegible] अर्थ विचारिता । न धातुचि[1] विचारिती तत्वतां । म्हणोनि वाद करि[illegible] । सभामाजीं सार्थ कथा ॥ ४५७ ॥ कित्येक लेखी उत्तर न देती । केवळ शब्दावरी वाद करिती । [illegible] मती । व्यर्थ प्रसक्ति[2] करूं नये ॥ ४५८ ॥ [illegible] समोरून । न जाणें हैंचि मलेषण । [illegible] तुकारामादिकांचाही ॥ ४५९ ॥ “ वेदाचा तो अर्थ आम्हांसीच ठावा इतरांनीं वाहावा भार माथां ” । एवढी ज्याची विद्वत्ता । [illegible] कंटाळले तत्वतां । भांडाळखोरीं ॥ ४६० ॥

**पाखंड्यांनीं पाटीं पुरविला धुमाळा । तेथें मी विठ्ठला काय बोलों १**
**कांद्याचा खाणार चोजवी[3] कस्तुरी । आपण भिकारी अर्थ नेणे ॥२॥**
**न कळे तें मज पुसता छळुनी । लागतां चरणीं न सोडिती ॥ ३ ॥**
**तुझ्या पायांविण दुजें नेणें कांहीं । तूंचि सर्वांठायीं एक मज ॥४॥**
**तुका म्हणे खाळ पडो त्यांच्या तोंडा । किती बोलों भांडां वादकांशीं ५**

( इंदिराप्रेस कॉपी, अभंग १०९ )

एवढी आपुली कर्मकथा । सांगितली याचि अर्था । कीं संपूर्ण समाधि साध्य नसतां । मध्यम मार्गें चालावें ॥ ४६१ ॥ भगवी करोनिया छाटी । भिक्षा मागूं नये तंबाखूसाठीं । आवडी भजावा जगजेठी । तो उपेक्षील हें पोटीं आणूंचि नये ॥४६२ ॥ एवं परस्त्रीसंबंधीही व्यवस्था । इतर स्थानीं वर्तवां । आपुली किंचित् जाणीव न मिरवितां । मानावें सर्वथा मम वचन ॥ ४६३ ॥ ज्यास अनुयायी होणें । तेणें ऐसें साच करणें । संन्यास आश्रमादि रक्षणें ।

१ शब्दाची व्युत्पत्ति. २ आसक्ति. ३ चोज=किंमत करणी.

तेंही सांगूं ॥ ४६४ संन्यासाची इच्छा होतां । तरी आपुली काष्ठप्रतिकृति करूनि तत्वता । तयासी संन्यास देऊनी पुजावी सर्वथा । संन्यासागमरक्षणार्थ ॥ ४६५ ॥ पुढें मरुदेवापि येती स्पष्ट । तेव्हां तयां निगमपुराणांश न दिसावा नष्ट । म्हणोनि निगमपुराणें रक्षणीं कल्पितादि सुप्रतिष्ठ । उपाय करावे ॥ ४६६ ॥ परि अशक्तें सदाचार न घेयावा । साचार पुतळा करूनि पुजावा । मंत्रांश बुडों न देयावा । निगमपुराणांचा ॥ ४६७ ॥ ग्रंथाध्ययन करितां बरवें । पवित्रापवित्र विभागावें । लौकिक संस्कृत शिकवावें । चतुर्वर्ण स्त्रीपुरुषां ॥ ४६८ ॥ पेसंडीतें मानूं नये । भेसंडीतें सांडूं नये । चरणचारी सोय । करीत जावी ॥ ४६९ ॥ मित्रावरीही मित्रता करावी । ईश्वर आणि गुरुकास धरावी । निज सद्वर्तनेंचि सभ्यता समजावी । गदोपचिति[1] गणावी विधर्मी भोम्या ॥४७०॥ विस्फोट[2] अंगीचा फोडावा । तेवी सधर्मी कुहकी[3] दंडावा । अधीनकमानदानें न गणावा । सुसभ्यपणा ॥ ४७१ ॥ भेसंडीचिया अर्था । गुरु करावें शिवसुता । तेथ पापाची वार्ता । कवण म्हणे ॥ ४७२ ॥ परि मात्र ते आपदीं । सदा वा असावी सद्बुद्धि । दरिद्रें असालागीं संधी । पेसंडीसी करूं नये ॥ ४७३ ॥ आपुला घराऊ करावा । परावा घराऊही सोडावा । विरोदा अवश्य जोडावा । आपुले घराऊ मिळणीं ॥ ४७४ ॥ उगाचि एकंकार करूं नये । अति जातिहावेही[4] भरूं नये । नाम केल्यावीण मरूं नये । भेसंडींत कांहीं तरी ॥ ४७५ ॥ स्त्रियांवरी उत्तम प्रेम करावा । परि विश्वास कधीं न धरावा । विधर्मी श्रीमान् नम्रावा । स्वाम्युपदेशें ॥४७६॥ परकर विनणें शिकावें । ते मोतिया ऐसे करावे । धर्में अंगुष्टा उद्धरावें । बिरेलपणें आपदीं ॥४७७॥ भेसंडीतें विखें । धर्मोत्सव हिंसा केवि ओळखे । संतोषीत येणें सुखें । म्हणावेत शिवकृष्ण ॥ ४७८ ॥ कूटार्थोपदेशें ऐसे । अया तयाचे उपास्यें । मधुराद्वैतवेषें । रंगवावें ॥ ४७९ ॥ रंगवितां आपुले झाले । तरी ते कृष्णीं मिळवावे भले । नातरी सम्मतीसी आणिले । एवढें

१ आजारी पडणें. २ फोड झालेला. ३ कबाड. ४ जातीच्या अभिमानास.

घुरे ॥४८०॥ परि भेसंडी मोडेल ऐसा । परधर्म करूं नये हिरासा । गद्यपद्य प्रति सारसा । पेसंडीविशेषा उपाय कीजे ॥ ४८१ ॥ जैसी होवी कामी । ते निश्चयें कचानुगामी । तेवि सुखदुःखाच्या ऊर्मी । आत्मग्रामीं सखाव्या ॥ ४८२ ॥ औषधीसिद्धि जयाकडे । योगभाष्यकृत् वदवी रोकडे । ते तेथोनि संपादूनि फुडे । द्यावें बळ घडफुडें गुरुदान ॥ ४८३ ॥ जो उपाधि आपुली निवारी । तो शत्रुही जावो मोक्षपुरीं । ऐसा आशिर्वाद कुसरीं । देत जावा ॥ ४८४ ॥ विशेष एकनयनागमीं[1] मिळे । येथ दिशामात्र उजळे । बहुत करावे सोहळे । हरिहरमंदिरादिकांचे ॥ ४८५ ॥ नैय्यायिक प्रत्यक्षखंड वाढवावा । तेणें योगभाष्यवचनभाग अनुभवावा । ऐसाचि व्यवहार करावा । धर्मनिष्ठ होवुनी ॥४८६॥ बुद्धिमान् बुद्धिमती । कराव्या प्रीतिविवाहस्थिति । म्हणजे वेदपुराणविधि करावा निगुती । परि विशेष छत्तीस गुणादि भ्रांति पडूं नये ॥ ४८७ ॥ कुरूप सद्गुणी कामिनी । तरी ते सोडूं नये निर्वाणीं । दुर्गुणी सुरूप म्हणोनि । अंगिकारूं नये ॥४८८॥ पिकदाणीच्या रूपासाठीं । सांडूं नये धनरक्षक लोहपेटी । अति सुरूप आणि कर्कशा पाठीं । लावूं नये ॥ ४८९ ॥ जेणें शरीराचा होय चुरा । ऐसा जुना व्यापार नाहीं बरा । आणि पतिपत्नीप्रेम मोडे साजिरा । ऐसा नवा व्यापार करूं नये ॥ ४९० ॥ शिक्षक अनुभवी जुनाचि पहावा । वृषभ किंवा शिष्य उत्तम नवा । विचारें आळस भरूं न द्यावा । शरीरामाजीं ॥४९१॥ देहशक्तीनें मनस्थैर्य न मोडावें । लागटपणें मित्र न जोडावे । घरीं आलिया न दवडावें । सज्जन पुरुषा ॥४९२॥ प्रसंगीं औषध होय विष । म्हणोनि निरुपयोगी न म्हणावें कवणास । परंतु योजना करणें बुद्धीस । आपुल्या शिकवावें ॥ ४९३ ॥ आपण परतंत्र होऊं नये । दुजिया परतंत्र करूं नये । स्वातंत्र्याहंकारें भरूं नये । आडदांडसें ॥ ४९४ ॥ एकांतीं स्त्रियेशीं प्रेम करावा । परि एरव्हीं आज्ञेनें उपदेश करावा । योग्य मंत्र[2] न निवारावा[3] । स्त्रियेचा वा कैंकुराचाही ॥४९५॥

---

१ या नांवाचे ग्रंथांत. २ विचार, सल्ला. ३ टाकावा.

संस्कृत, स्वभाषा, राजभाषा, तिन्ही । आपण शिकाव्या आणि शिकवावी गृहिणी । कन्या शिकवाव्या मातेकडूनी[1] । आणि लहानपणीं पुत्रही ॥ ४९६ ॥ अधिक आल्याविण बोलूं नये । गुण कोणाचा सांडूं नये । कार्याविण बोलूं नये । मार्गे वर्म कोणाचेंही ॥४९७॥ कला बहुत शिकावी । योग्य उपयोगा आणावी । परि कलोपयोगाधीन न करावी । वृत्ति कदा ॥ ४९८ ॥ सुयंत्र हल[2] नाहीं । म्हणोनि शेत न सांडावें कहीं । ईर्षा असावी कारणाविषयीं । फलाविषयीं नसावी ॥ ४९९ ॥ रुक्माबाई करिते उत्तम पक्वान्न । म्हणोनि राधाबाईनें न न्यावें चोरून । स्वयंपाक मात्र उत्तम तिजकडून । अधिक ईर्षेनें शिकावा ॥ ५०० ॥ व्यसन लागूं देऊं नये । परि व्यसनसाक्ष सोडूं नये । दंभाचारें होऊं नये । विख्यात जगीं ॥५०१॥ पोट भरावयासाठीं । जरी विद्यापरीक्षा दिधल्या कोटी । तरी कार्यकर्त्यानें तयांपाठीं । लागूंचि नये ॥ ५०२ ॥ भल्याचें वचन खंडूं नये । भांडाळासी तंडूं नये । चातुर्य तंव सोडूं नये । कुंटिणीचेंही ॥५०३॥ मग्न अंतरीं असावें । तेणें जनीं उदास दिसावें । महत्कार्य न पुसावें । कळल्यावरी बहुतांतें ॥ ५०४ ॥ क्षुल्लक कार्याचिया वार्दी । क्षुद्र[3] गुंतवावे त्रिशुद्धि । आपण संवेशवावी[4] बुद्धि । महत्कार्यीं ॥ ५०५ ॥ जे कां आळशी तमोगुणी । विश्वासतील आपुल्या वचनीं । तयांसी करावें रजोगुणी । करोनि उपाय भलताही ॥५०६॥ जे का रजोगुणी वेडीं । तयासी योजावो भेसडी । जे शांत रजोगुणी फुडी । तयांसी करावें सत्वनिष्ठ ॥ ५०७ ॥ तीव्र संवेगिया क्रम नाहीं । क्रम मध्यमार्थेचि पाही[5] । ओळखोनि ठेवावें उपायीं । जेथींचें तेथ ॥५०८॥ कोणासी अपाय करूं नये । परि आपणाही अपाय होऊं देऊं नये । सामोराविण धरूं नये । मागें द्वेष निकामी ॥ ५०९ ॥ विष्ठेंतूनही सोनखत घेवी । मघार्थी[6]

---

1 स्वतः बापानें मुलीस शिकवूं नये. २ नांगर चांगला नाहीं म्हणून. ३ क्षुद्र लोक. ४ शिरकवावी. ५ मध्यम दर्जाच्या मुमुक्षूंकरतांच अभ्यासाचा असतो; उत्तमांकरतां नसतो. ६ मघाची अपेक्षा करणारे.

माशांचेही ओक सेविती । तेवी नीचाचीच सत्कार्यार्थी । ओळखूं नये ॥५१०॥ धर्मनिष्ठ म्हणोनि । दीक्षित[1] पशु चिरणें शिकती कसायापासूनि । तेवी आत्मोपकारक विद्या गुणी । कोठुनिही शिकाव्या ॥ ५११ ॥ सर्वांस गुह्य सांगूं नये । सुहृदा जवळीं चोरूं नये । दुर्बल सुहृदा सोडूं नये । गौरविल्यावीण ॥ ५१२ ॥ आपुलें पाहोनि व्यवेपण । जयाचें उगेनि आनंदे मन । आपुलें ऐकोनि चाईटपण । जयास उगाचि खेद होय ॥ ५१३ ॥ तो उत्तम सुहृद म्हणावा । श्रेष्ठ पित्याहूनिही गणावा । तो ईश्वरेंचि पाठविला समजावा । उपकारार्थ ॥ ५१४ ॥ समान शीलव्यसनेंकरून । जयाचें सख्य, तो मध्यम पूर्ण । जो वश केला उपायेंकरून । तो सुहृद गौण समजावा[2] ॥ ५१५ ॥ यशस्वी सद्वृत्तिकारण । समजावें हें मज ईश्वराज्ञाप्रेरण । चुकों द्यावें परंतु करावें अनुमान । सयशाचें चातुर्यबुद्धि ॥ ५१६ ॥ मलमात्र टाकोनि देती । परी गुद मलिन म्हणोनि कापून न ठेविती । तैसी नीचसंगेंही स्वार्थरीति । नीच त्यजूनि अवलंबावी ॥ ५१७ ॥ अचतुर गुरु करूं नये । अधीनकमानवाहूलें भरूं नये । उगें कठिण तंव बोलूं नये । भिकारियासीही ॥ ५१८ ॥ द्यावे मूठभर दाणे । परि प्रेम करावा सहसवचनें । जरी आपण नाहीं देणें । तरी कवणाकडूनि देववावें ॥ ५१९ ॥ नास्तिकही जरी जाहला । तरी भिकारी तयाच्या उपयोगा आला । परि आंगणावांचोनि नाहीं भला । अंतर्गृहांत आणितां ॥ ५२० ॥ आपणा कळली जरी सत्य वाट । तरी गर्वे वृद्धा निषेधूं नये स्पष्ट । व्यवहारीं सर्वांसचि कष्ट । सर्वांसचि सर्वोपयोग प्रसंगें ॥५२१॥ परोत्कर्ष पाहोनि रुसूं नये । कार्यार्थ देवावरी बसूं नये[3] । गोड व्याख्यानें फसूं नये । नुसुधें[4] कोणाच्या ॥५२२॥ जिहीं अनंत वेळां आपुलें । निश्चयें हित केलें । दैवें आपणा वदूनण फेडणें आलें । तरी नम्रचि बोलावें ॥५२३॥ ईश्वर आहे सर्वकर्ता । हें सत्य, परी आळस न धरावा चित्ता । समजावें की

---

१ यज्ञ करणारे ब्राह्मण. २ हे मित्रांचे तीन प्रकार होत. ३ दैववादी होऊं नये. ४ नुसत्या.

मजकडूनि सुकार्य करविता । तोचि आहे ॥ ५२४ ॥ राखावया आपुले सांगावी । उपयोगा आणावे कोप आणि शांती । विकोपा जातां समानस्थिती । तटस्थ होऊनि अन्य गुरुपर्थी रिघावें ॥ ५२५ ॥ बोबडें बोबडें बोलुनि । बाळें रंजवावीं प्रसंगानीं । ओळखावीं तन्मुखें सुकरणीं । तद्वृद्धांची ॥५२६॥ ब्रह्मचारी असावें । उपाशी वर्नी न बसावें । लोकांत वेश्यागामी दिसावें । परि आत्मनिष्ठ असावें निष्कलंक ॥ ५२७ ॥ वनांत चोर भेटतां । तें सर्वस्व नसलींही साधुत्वाची वार्ता । प्रसंग पाहोनि तत्वता । आणावी अंगीं ॥५२८॥ निष्कामाविण होऊं नये यती । समाजावीण जाऊं नये तीर्थीं । सुजन भेटलिया उगेचि व्रती[1] । होऊनिया बैसूं नये ॥ ५२९ ॥ जयाचा बहुत द्वेष करिती । ऐशा एकाकडे उघड जाऊं नये प्रीती । सर्वां नीतींमाजी मुख्य नीति । धर्म राखोनि निजलोकस्थितिसांभाळू ॥ ५३० ॥ कांटेरा मार्ग काढूं नये । उगेचि स्त्रियेस ताडूं नये । शिष्य कल्पांतीं जोडूं नये । आळशी आणि गोडभाषी ॥ ५३१ ॥ परदेशीं भिकेस लाजूं नये । स्वदेशीं भीक मागूं नये । भीक न मिळे तेथ भंगूं नये । द्रुमपाहुणेरही ॥ ५३२ ॥ ऊन असतां उगेचि वस्त्र घेऊं नये । पाऊस येतां उगेचि घर सोडूं नये । धर्माधीण रिकामें बैसूं नये । प्रसंग नसतां ॥ ५३३ ॥ दैवें झालिया रोगप्राप्ति । तरी भंगूं न द्यावी चातुर्यवृत्ति । आचरोनी बाळवृत्ति । सहस्र मातृबुद्धया युवती रंजवाव्या ॥ ५३४ ॥ जो आपुलिया प्रश्नीं । उत्तर देईल विचार करोनि । तयाच्या कर्तृत्वानुगुणी । विचार अधिक करावा ॥ ५३५ ॥ आपुल्या भेटीस न येतां । कवणाचा शब्द ऐकूं ये अवचिता । तो आपणासंबंधी निघडतां । तद्विचार तत्वतां प्रथम कीजे ॥ ५३६ ॥ धार्मिक कीर्तनें करावीं । भगवदवतारचरित्रें वर्णावीं । निर्गुणें[2] चाळूं नये बरवीं । वेडीं वाकुडीं मर्मभेदीं ॥ ५३७ ॥ जयाचा विषय सुटला नाहीं । तेणें सगुण उच्छेदूं नये

१ मौनादि धारण करून, सत्संगास मुकूं नये. २ निर्गुण उपासनेच्या वर्णनानें.

गत प्रार्थना शब्द परी । विशेष चर्चा न विचारिजे ॥७२०॥ नाम देवतेसी आवडे । तें तंव पथ्य रोकडें । आणि अपथ्य जें नावडे । तत्सदृशही ॥ ७२१ ॥ घडेल देवतेचा अपमान । ऐसे जे स्वभोगपदार्थ आण । तेही अपथ्य समजोन त्यागावे कीरु ॥ ७२२ ॥ स्वनिर्मित मंत्रासी । पथ्यापथ्य एवढीच सरसी । ज्याचा मंत्र त्या शिष्यासी । भिन्न भिन्न असे तें ॥७२३॥ जाति वर्ण प्राण । तत्व ग्रहदशा नक्षत्र पूर्ण । ताडणादि संस्कारकरण । करितां निर्माण, कळावे शब्दगत ॥ ७२४ संस्कृतावरोनरी भलतिया भाषेचा । मंत्र येतां साचा । सार्थ अथवा अनर्थाचा दोष । नाहीं तयातें ॥ ७२५ ॥ विश्वासें अमंत्रही मंत्र घडे । तरी मंत्र निर्माण कां करितां फुडें । सिद्धान्ती म्हणे हें जरी घडे । तरी विघ्न येती ॥ ७२६ ॥ तेचि मंत्रें कार्य होय निर्विघ्न । यासी देतों उदाहरण । कीं आघातादि दुःख दूर होय कांहीं काळ करितां सहन । परी उपायानें लौकर हारपे ॥ ७२७ ॥ असो, शास्त्रीय मंत्र जे होती । तयां शास्त्रीय पथ्यापथ्य निश्चितीं । स्वनिर्मित मंत्र जे होती । तयां स्वनिर्मित पथ्यापथ्य ॥ ७२८ ॥ आपण करोनी देवता प्रसन्न । तियेसी ठेवावी शपथ घालोन । दुसरियासाठीं मंत्र निर्माण । परोपकारें कीजे ॥ ७२९ ॥ परी हा नियम अगृहस्थासी । जो मुख्य नाथसंप्रदायी त्यासी । म्हणोनी गृहस्थें या निर्मितीसी झटोंचि नये ॥ ७३० ॥ भक्तींत नाम मंत्रकल्प । तेथ पथ्यापथ्य असे अल्प । आणि सात्विक संकल्प । पथ्य सदा ॥ ७३१ ॥ अनाचार अपथ्य पूर्ण । घडलिया प्रायश्चित्त नामोचि परम । परी सिद्धिमंत्राकारण । पथ्यापथ्य अवश्य दृढ ॥ ७३२ ॥ सिद्धिमंत्रांत पुरुषदेवता । आणि मंत्र अन्यलिंगी असतां । तरी स्वामिभाव अथवा पिता । संबंधी कीजे ॥ ७३३ ॥ स्त्रीसी माधुर्यसंबंधही घडे । स्त्रीदेवता अन्यलिंगमंत्रीं मातृसंबंध जोडे । समदेवतालिंग मंत्रीं पडे । सदा स्वामिसंबंधु ॥ ७३४ ॥ परी सिद्धीपुढें तुच्छ सकळ । म्हणोनी पथ्यापथ्य पाळणें प्रबळ । वात्सल्य अथवा स्त्रीत्वादिसंबंध केवळ । सिद्धपर्यंतचि घडती म्हणोनी पाळणें पथ्यापथ्य ॥ ७३५ ॥ शास्त्रसिद्ध

जे भाव । तद्विरुद्ध निर्मू नये मंत्रठेव । जैसी गिरिजा सांडुनी शिव । जापक स्त्री होईल हा मंत्र निर्मू नये ॥ ७३६ ॥ शास्त्रीं ज्या देवता परपुरुष भोगिती । तैसे भाव मंत्रीं तदर्थी । निर्मितां प्रायश्चित्तें सुटे सहजगति । नातरि निर्माण करतिया महानरकू ॥ ७३७ ॥ शास्त्रीय लिंगभेदेंकरून । वशीकरणादि मंत्र करावे निर्माण । गुरुआज्ञा वा तपेंकरून । अलिंगमंत्रही निर्मावे ॥ ७३८ ॥ आज्ञारहित निर्मित मंत्रीं कूटादि वर्ज्यावें । आज्ञादत्त निर्मित मंत्रीं आज्ञा-समचि करावें । मनोमुद्रेनें पडताळोनी धरावें । तीव्र संवेगें ॥७३९॥ एवं हे नियम निर्मिताप्रति । शास्त्रीया शास्त्रीयचि नियम होती । तंव सच्छिष्य कर जोडोनी विनंति । सद्गुरुप्रति करिता होय ॥ ७४० शास्त्रीय मंत्र असलिया-वरीं । कां पडावें निर्मितीच्या भरीं । तेव्हां सद्गुरु म्हणती मधुरोत्तरीं । बापा ही कुसुरी नाथसंप्रदायींच ॥ ७४१ ॥ कित्येक शास्त्रीय मंत्र युगपरत्वें फळती । कित्येक शास्त्रीय मंत्रां शाप निगुती । कित्येक शास्त्रीयमंत्र सुप्रसिद्ध असूनही उमापति । न जावें दुष्टाहातीं म्हणोनी खिळाटी[१] ॥ ७४२ ॥ युग-परत्वें असती ते सुसिद्धही निरुपयोगी । तेथ इतरां कोण म्हणे उपयोगी । शाप जया मंत्रांसी देती योगी । तयांसी शापमोचन करणें लागे ॥ ७४३ ॥ वसिष्ठादिशाप गायत्र्यादि मंत्रातें । तन्मोचन ठाऊक तयांस फळती ते । जरी भक्तीनें देती चित्तशुद्धीतें । तरी सिद्ध्यर्थ शापमोचन पाहिजे ॥ ७४४ ॥ आणि शापमोचन करितां । अंगीं कालानुसार पाहिजे आर्षवचव्यवस्था । आतां खिळाटिले जे मंत्र तत्वतां । तयांसी उत्कीलन[२] पाहिजे ॥ ७४५ ॥ उत्कीलन नसतां । सुसिद्धही जाती वृथा । सप्त कोटि महामंत्रांची अवस्था । ऐसीचि जाहली आहे ॥ ७४६ ॥ गीतादि मालामंत्र जाण । परी ते परलोकमोक्षप्रधान । सिद्धि खिळे कालेंकरून । तयांलागीं ॥ ७४७ ॥ म्हणोनी सिद्धीसाठीं । नाथपंथीं, धीकुनी शाबरी[३] । मंत्रनिर्माणकसवटी । दाखविली हे ॥७४८॥ नाना-कुलादि सिद्धपंथांत । तांत्रिकमंत्रशुद्धिकरणचि दिसत । परी निर्माणशक्ति तंव

१ खिळे मारून बंद करणें. २ खिळे काढणें. ३ शाबरांचा आश्रय.

यथार्थ । नाथसंप्रदायांतचि आहे ॥ ७४९ ॥ यद्यपि गृहस्थासी अन्य देवता-। प्रसादें मंत्र न ये निर्मितां । परी पंचायतन स्वाम्यादिप्रसादें मंत्र निर्मितां । दोष गृहस्थाही घडेना ॥ ७५० ॥ अलिंग मंत्रारंभी शपथ । स्वगुरुनामें शक्तिपात वाणीदेवता हृदयस्थ । स्वगुरुभक्तिवृत्ति यथार्थ । गुर्वादिपूज्य शपथ मंत्र-स्फूर्ति ॥ ७५१ ॥ हे अस्त्रमंत्र कराड । तयांची निर्माणरीति गूढ । परी येथ पथ्यापथ्य दृढ । आधि पाहिजे ॥ ७५२ ॥ चुकलिया साधकाचें मरण । आतां सांगू मुद्रा निर्माण । देवता-अपमान न होय ऐसें सम्यक् देवताचिन्ह । शरीरावयवसंक्रमण बोलिजे मुद्रा ॥ ७५३ ॥ असलिया ऐहिक कामासक्ति । उपचार करावे जे देवा आवडती । अथवा भावनान्वयें पदार्थी । उपचार भाविजे ॥ ७५४ ॥ भावनान्वयें बाह्य उपचार करून । मग करावें मानस-पूजन । मंत्र जो केला निर्माण । तो जरी नियमें फळेना ॥ ७५५ ॥ तरी शास्त्राधारें दशविध संस्कार । करूनी चेतवावा मंत्र । परी उत्कीलन प्रकार । निर्मित मंत्रीं लागेना ॥७५६॥ अक्षर लक्ष चतुर्गुण[1] । जप नियमावा विशेषें करून । आद्यन्त सुसिद्ध असलिया जाण । स्मरणचि नियमावें ॥ ७५७ ॥ मंत्र घेवोनि शिष्य उन्मत्त । होतां तो मंत्र शापावा त्वरित । मंत्र शापावया स्वनिर्मित । अधिकार आहे निर्माणकर्त्या ॥ ७५८ ॥ वावास इंद्रें चोरितां । नाथें शापिलें तत्त्वतां । कीं नाथपंथीं छळ न होतां । तरीच अस्त्र फळेल हें ॥७५९॥ गोरक्षनाथें शिष्याकारण । उन्मत्त पाहतां स्वनिर्मित मंत्र शापिले संपूर्ण । कीं माझी मंत्रकला जे करतील धारण । ते पावतील पतन महा-नरकीं ॥ ७६० अध्यात्मबोधार्थ शिष्याप्रति । बळवीत असतां तृतीय नाथमूर्ति । मंत्र सिद्धांनें फुगोनी निश्चितीं । शिष्य प्राण घ्यावया धांवती नाथांवरी ॥ ७६१ ॥ तेव्हां शापिलें स्वनिर्मित मंत्रा । मत्स्येंद्रसंहितादी हे कथा पवित्रा । अर्वाचीन भक्तिवत्स्वामूर्ती ही कथा । बोलिली आहे ॥७६२॥ म्हणाल सिद्धीचें काय कारण । उगेचि कां करावे मंत्र निर्माण । तरी प्रति-

---

१ मंत्राचीं जितकीं अक्षरें त्याच्या चौपट लाख जप.

शोधाया कालिवर्धक जन । पाहिजे ते ।। ७६३ ।। स्वसंप्रदायोच्छेदकासी । शमवाया पाहिजे हेंहि विशेषीं । वादी म्हणे तरी तुम्ही लोकांसी । कां देत नाहीं ताविताादि ।। ७६४ ।। तेव्हां म्हणे सिद्धान्ती । ताविताादि दिधले जयाप्रती । ते भिन्नाभिन्न पथ्यापथ्य न पाळिती । मग होतीं अवगुणी।।७६५ संप्रदायविशेषाची निंदा होणें । तयापरीस बरवें ताविताादि न देणें । कावळियासी अमर करणें । कासयासाठीं ।। ७६६ ।। मजमार्गी आहे मंत्र निर्माणशक्ति । आणि ती लिहिली आहे इये ग्रंथीं । उपयोग पडेल तें दीक्षितीं । इये रीति निर्मिजे मंत्रा ।। ७६७ ।। वादी म्हणे गुरुविश्वास । एवढा मान्य जरी तुम्हांस । तरी कां त्यागिलें पूर्व गुरूस । सांगावें तें ।। ७६८ ।। सिद्धान्ती म्हणे मी विश्वास धरितों । तरी गुरुकथित आगमोक्त फळ पावतों । परी असार जाणोनी विटलों होतों । फळावें तया ।। ७६९ ।। म्हणोनी सोडिला मानभाव । दुजियांहीं उपदेशिला दत्तदेव । परी जन्मांतरींहूनि गोपिकाधव । आवडता माझा ।। ७७० ।। तेणें बळें ओढितां मन । माझा शिथिल झाला प्रयत्न । परी मज वाटे त्या विधानें करून । मंत्रही नव्हता घेतला कीं ७७१ अथवा लौकिक विधानेंहि न घेतला । ऐसा जाणोनीच बारा वर्षे सोडिला । परी गुरुभाव नाहीं निंदिला । मनांतुनी ।। ७७२ ।। पुढें तिहींच येवोनी भलें । कृष्णमंत्र जपावा ऐसें बोलिलें । परी यापूर्वीच अंगिकारिलें । होतें तातांहीं मज ।। ७७३ ।। तातांनीं सविधान मंत्र दिधला । परी त्यांचि होवोनि चतुरक्षरी याचिला । तथापि कृष्णमंत्र आवडी मनाला । सोडीचिना ।।७७४।। म्हणोनी निज हृदयीं घोंटाळा । दाह तापवी कपाळा । तथापि निश्चय हाचि या वेळा । उचित दावितील तातचि ।।७७५।। फळ मिळो वा न मिळो कांहीं । परी तातपद त्यागणें नाहीं । आवडी कृष्णपायांवरीही । ठेवोनिया ।।७७६।। येथें अथवा पुढें । मार्ग उघडेल मी जाणें फुडें । उचितानुचित रोकडें । तातांस ठावें ।। ७७७ ।। परी ऊहबुद्धिसिद्धिस्फूर्ति । या तातदत्त मंत्रापूर्वी नव्हती या हातीं । प्रार्थना करोनी लोकांप्रती । ग्रंथ वाचाया लावीत हे तों ।। ७७८ ।।

असो हें उगे निज चरित्र । निर्मावे मंत्र महामंत्र । भक्तीनें स्तोत्रमालामंत्र । तेही निर्मिजे ॥ ७७९ ॥ परी बीजमंत्रनिर्माण । न करावे आप्तेय जन्माविण । गोमुखी जन्मोनि बीजमंत्रनिर्माण । गौण म्हणती ॥७८०॥ अथवा तीव्र विश्वासें सद्‌गुरुदीक्षा । जन्म घडतां बीजमंत्र निर्मावे पडलिया अपेक्षा । साधकविघ्ना लावावया दीक्षा । दीक्षामंत्र निर्मावे ॥ ७८१ ॥ स्वगुरु अवतारनामें संप्रदायवर्धन । किंवा इश्वराश्रम स्थापोन । चालावें म्हणोनी सिद्धमंत्र निर्माण । करणें हें प्रयोजन मुख्य ॥ ७८२ ॥ अधिकारियार्थ प्रणव ठेवावा । इतरार्थ न ठेवावा । निर्मित मंत्रींही ओळखावा । भाव ऐसा ॥ ७८३ ॥ महाविद्या क्षुद्रविद्या । आणि देव साबरी भूतविद्या। कैशा निर्माव्या हे आद्या। प्रक्रिया येथ सांगितली ॥ ७८४ ॥ नाममंत्रीं महाविद्या । बंधनमंत्रीं क्षुद्रविद्या । कराडमंत्री साबरी विद्या । बोलिली आहे ॥ ७८५ ॥ कराडमंत्रीं प्रार्थना पदें । देव-साबरी बोलिजे सिद्धें । आणि कराडमंत्रीं रोधन-पदें । भूतसाबरी बोलिली ॥ ७८६ ॥ भूत साबरींत पथ्यापथ्य । नीचासी सांगावें भूतासी आवडे न आवडे तथ्य । भूतसाबरींत पथ्यापथ्य । शुद्धासी वेगळे आहे ॥ ७८७ ॥ इतर मंत्रीं जाण । पथ्यापथ्य सर्वांसी उपर्युक्त समान । भक्तीमाजी मंत्रग्रहण । भगवन्नाम अथवा शास्त्रोक्त ॥ ७८८ ॥ नामशास्त्र बहुंयुगीं प्रमाण । निष्कामा प्रेमाचे मूळ कारण । शापमोचन उत्कीलन । नलगे तया ॥ ७८९ ॥ ' न सांपडे शास्त्रीं पुराणीं पाहतां, तेसी या अनंता ठेवूं नांवें ' । इत्यादि तुकाराम बोलिले स्वभावें । म्हणोनी शास्त्रोक्त असतांही प्रेमवशें निर्मावे । नाममंत्र घडती ॥ ७९० ॥ स्वनामाक्षराहूनि मंत्राक्षरातें । प्रथमद्वितीय स्थानीं सिद्धसाध्य म्हणिजेतें । तृतीय चतुर्थस्थानीं सुसिद्धरिपूतें । ओळखावें ॥ ७९१ ॥ येणेंचि क्रमें पंचम षष्ठादि समस्त । स्थानें ओळखावीं परी सुसिद्धहि होय प्रथमहि अक्षरगत । इतर संस्कार मंत्रशास्त्रीं पहावे समस्त । किंवा प्रसंगें येतील याही ग्रंथीं ॥७९२॥ आतां स्पर्शादि प्रकारीं । महादीक्षा कवणे परी । ययाची दृढश्रद्धा सद्‌गुरुवरी । तदर्थ सांगूं ॥७९३॥ (अपूर्ण)

[ महादर्शितील स्वर्शादि प्रकार सांगण्यास या ओवींत आरंभ होऊन हा अध्याय महाराजांच्याकडून असाच अपूर्ण राहिला ! यावरून 'दैव देतें व कर्म नेतें' या म्हणीची आठवण होते ! ]

---

## खुलासा.

या ग्रंथांत गुरुस्वरूपविवेचन, गुरूची आवश्यकता, संप्रदायाची आवश्यकता, आगमांचें प्रामाण्य, नाममाहात्म्य इत्यादि बरेच विषय आले आहेत व आधुनिक आंग्लविद्याविभूषित लोकांकडून आपल्या धर्मावर, ज्ञानावर व भक्त्यादिकांवर जे आक्षेप केले जातात, त्या सर्वांचें उत्तम रीतीनें निराकरण केलें आहे. या ग्रंथाचे 'पूर्वविहार' व 'उत्तरविहार' असे दोन भाग होणार होते, पण श्रीमहाराजांच्या आजारीपणामुळें 'पूर्वविहार' झाल्यानंतर उत्तरविहाराचे एक दोन अध्याय होऊन पुढें ग्रंथलेखन बंद पडलें ! पूर्वविहारांतही एक आगमाध्याय व उत्तरविहारांतील एकवीस व बावीस हे अध्याय कांहीं अंशानें अधुरे राहिले आहेत !

एक सांप्रदायिक म्हणून केवळ अभिमानानें मी लिहितों असें नसून नम्रपणें सत्य तेंच वाचकांपुढें मांडतों कीं, सदरहू अधुरें राहिलेलें कार्य पुरें करणारा आज तरी कोणी समर्थ या अखिल भरतखंडांत नाहीं ! आपला हा भरतखंड पुण्यभूमि असल्यामुळें आजही कांहीं महात्मे आहेत, पण या क्षेत्रांत अंगीं अद्वितीय माहात्म्य असून, अल्पसाही गाजावाजा न करितां कार्य करणारे एकमेव श्रीगुलाबरावमहाराजच होत.

खालील ग्रंथीं लिहिल्याप्रमाणें हें अधुरें राहिलेलें कार्य पुरें करण्यास श्रीमहाराजांस पुन्हां अवतारधारणार्थ खालील श्लोकांनीं विनवून मी माझे वाणीस त्यांचे नामगानांत विराम देतों.

**नमः श्रीसच्चिदानंदमात्रैकवपुधारिणे ।**
**श्रीपांडुरंगनाथाय नतक्षेमकराय च ॥ १ ॥**
**संसाराबुधिमग्नानां लीलयोद्धरणाय वै ।**
**स्फुटीकृतं भक्तितत्वं भक्तेआलंबनं तथा ॥ २ ॥**

**श्रीमत्सद्गुरु ज्ञानेश्वरचरणार्पणमस्तु ॥** —प्रकाशक.

॥ श्रीज्ञानराजमाउली ॥

# ग्रंथगौरव ( पुरवणी )



## लेखकांचीं नांवें व अनुक्रम



टीप:--भगवान् श्रीसद्गुरु गुलाबराव महाराजकृत समग्र ग्रंथावलि, द्वितीय आवृत्ति, ग्रंथानुक्रम ६ वा, "अलौकिकव्याख्यानमाला" या ग्रंथाचा गौरव अनेक थोर विद्वद्रत्नांनीं व वृत्तपत्रकारांनीं केला आहे. तें सर्वच व समग्र येथें छापल्यास स्वतंत्र ग्रंथ होईल ! म्हणून स्थलाभावीं थोडक्यांत निवडक उतारे या भागास जोडले आहेत.

ज्ञानेश्वर उद्धव मांडरे.

( १ )

वऱ्हाड व मध्यप्रांतचे अनभिषिक्त राजे,
कौन्सिल ऑफ स्टेटचे प्रथमपासून मेंबर श्रीमंत गणेश श्रीकृष्ण ऊर्फ
दादासाहेब खापर्डे, उमरावती.

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत।
अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् "

( श्रीमत् भगवद्गीता )

'ज्या ज्या वेळेस धर्माची ग्लानि व अधर्माची वृद्धि होते, त्या त्या वेळेस मी आपल्या आत्म्याला उत्पन्न करितों, म्हणजे संतांचा प्रादुर्भाव करितों.' ह्या वचनावरून असें दिसतें कीं, धर्माचा व देशाचा अभ्युदयकाळ समीप आला म्हणजे प्रथम संतविभूति अवतीर्ण होतात. कोणत्याही राष्ट्राला हाच नियम लागू आहे व आपल्या भरतभूमीला तर हा नियम विशेषच लागू आहे. जगद्गुरु आद्य श्रीशंकराचार्य, श्रीज्ञानेश्वर-एकनाथ-तुकारामादि संतविभूतींप्रमाणें आमच्या विदर्भभूमींत नुकतीच श्रीसद्गुरु गुलाबरावमहाराज ही महाविभूति अवतीर्ण होऊन गेली.

श्रीगुलाबराव महाराज यांचें दर्शन मला ते माधानहून अमरावतीस प्रथम आले तेव्हांच घडलें. अमरावतीस आल्यावर माझे घरीं मधून मधून त्यांचा मुक्काम असल्यामुळें माझ्या घरांतील सर्व मंडळींवर महाराजांनीं कृपा केली. त्यांचें सर्वच चरित्र परम अद्भुत व आश्चर्यपूर्ण आहे. त्यांच्या प्रत्येक बारीकसारीक कृत्यांत, बोलण्याचालण्यांतसुद्धां त्यांचें अलौकिकत्व प्रत्ययास येत असे. ते जन्मांध असतांही उपजतच महाज्ञानी व सिद्ध कोटींतले होते. सर्व विद्या व सर्व शास्त्रें यांचें रहस्य त्यांच्या मुखांतून स्वयमेव, नित्य व अस्खलित प्रगट होत असल्यामुळें सर्वज्ञतेनें श्रीगुलाबराव महाराजांना अल्प वयांतच माळ घातलेली होती. अनेक विषयांतील थोर, बुद्धिमान्, चिकित्सक, शोधक आणि वादनिपुण पुरुष जेव्हां जेव्हां त्यांच्याशीं वादविवाद

करण्यास येत होते, तेव्हां तेव्हां त्या लोकांनीं हात टेकून महाराजांची अजिंक्यता कबूल करून त्यांच्या चरणीं नम्र भावानें सतत लीन व्हावें ! कोणताही विषय समजावून सांगण्याची त्यांची हातोटी तर सर्वस्वी सप्रमाण, सशास्त्र व म्हणूनच पूर्ण विश्वास उत्पन्न करणारी होती.

श्रीगुलाबराव महाराज यांची ग्रंथनिर्मिति खरोखर आश्चर्यकारक व अपार आहे ! त्यांच्या ग्रंथांची भाषा अत्यंत रसाळ, प्रासादिक व प्रतिभासंपन्न आहे. आपल्या देशांतील, विशेषतः महाराष्ट्रांतील अनेक भिन्न भिन्न शाखेच्या विद्वानांना श्रीगुलाबराव महाराज यांच्या प्रत्यक्ष दर्शनाचा लाभ झालेलाच आहे. त्यांपैकीं कित्येक पुराणमतवादी मोठमोठ्या पदीच्या विद्वानांना महाराजांच्या ग्रंथांनीं अगदीं मोहून टाकलेलें आहे. सारांश, प्राचीन व अर्वाचीन ग्रंथांचें दृढतर सोपपत्तिक व सप्रमाण ग्रथित केल्यामुळे श्रीगुलाबराव महाराजकृत समग्र ग्रंथ सर्वस्पर्शी व सर्वसमावेशक झाले असून तो एक "विश्वकोश" च झालेला आहे. ईश्वरअवतारी विभूतींपैकीं श्रीसद्गुरु गुलाबराव महाराज हे आहेत, अशी माझी अचल श्रद्धा व पूर्ण समज आहे. अशा लीलाविग्रही अवतारी महापुरुषाच्या ग्रंथाविषयीं कोणीं कितीही वर्णन केलें तरी तें निःसंशय अपुरेंच ठरणारें आहे.

( अलौकिक व्याख्यानमाला–प्रस्तावना )

( २ )

साहित्यसम्राट् श्री. न. चिं. केळकर

संचालक "सह्याद्रि, केसरी व मराठा" पुणें.

श्रीगुलाबराव महाराज हे वऱ्हाडनागपुराकडे होऊन गेलेल्या अलौकिक सत्पुरुषांपैकीं एक होत. यांची कीर्ति प्रथम ऐकल्यानंतर कांहीं दिवसांनीं यांची माझी गांठ पुण्यास पडली. तेव्हां त्यांच्या विद्वत्तेचें तेज संभाषणांत चांगलें दिसून आलें. त्यानंतर प्रसंगाप्रसंगानें त्यांचे कांहीं ग्रंथ माझ्या

वाचनांत येऊं लागले. त्यांवरून त्यांच्या बुद्धिमत्तेची व विद्वत्तेची साक्ष मला अधिकाधिक पटत चालली.

जन्मभर चांगली डोळस दृष्टि असणारे आम्ही साहित्यिक लोक स्मृतीच्या कार्यांत किती दुर्बळ ठरतों, आणि डोळ्यापुढें संदर्भग्रंथ ठेविल्याशिवाय आमचें विशेष महत्त्वाचें लेखन कोणतेंहि कसें होत नाहीं, याची ओळख प्रतिदिवशीं आम्हांला पटत असते. यामुळें जन्मांध अशा श्री गुलाबरावांनीं इतकी अप्रतिम ग्रंथनिर्मिति कशी करावी, आणि ज्ञानार्जन, ज्ञानप्रतिपादन यांच्या कामीं डोळस विद्वानांवरहि ताण कशी करावी, याचें आश्चर्य वाटल्याशिवाय कसें राहील ?

श्रीगुलाबरावमहाराज यांचा विशेष गुण मला हा दिसला कीं, त्यांनीं पाश्चात्य तत्त्वज्ञानाचाहि परिचय करून घेतलेला असून, त्यांच्या ग्रंथांत पाश्चात्य व पौर्वात्य या दोन्ही तत्त्वज्ञानांच्या आधारें तुलनात्मक विवेचन केलेलें आहे. बापूजी अणे यांनीं मला त्यांच्या अनुभवाची जी माहिती सांगितली ती प्रत्यक्षप्रमाणें विश्वसनीय अशीच मी मानितों. रा. अणे यांचा श्रीगुलाबराव महाराजांशीं उमरावतीस विद्यार्थिदशेंत निकट परिचय झाला. ह्या वेळची हकीकत म्हणून ते अशी सांगतात कीं, विद्वत्तेनें व बुद्धिमत्तेनें श्रीगुलाबराव महाराज हे एखाद्या नामांकित पदवीधरापेक्षांहि आपला प्रभाव अधिक पाडीत. त्यांचें पाठांतर तर आश्चर्यकारकच होतें. कवित्वहि तसेंच. ते बोलूं लागले म्हणजे नुसते तासान्तासच नव्हे तर प्रहरान्‌प्रहर आपला वाक्प्रवाह खेळवीत. ते ओव्या किंवा अभंग रचूं लागले म्हणजे तोंडपाठ म्हणण्याच्या गतीनें रचीत. आणि ते लिहून घेतांनी लेखकाचाच हात लुला पडे. संतसंप्रदायांतील प्रवचनकार म्हणून त्यांची प्रसिद्धि सहजच झाली असती. पण संप्रदायाचें नांव सांगून मिरविण्याची अिच्छा श्रीगुलाबराव यांना नव्हती. त्यांचा पेषाहि गृहस्थाश्रमी होता. ते घरबसल्या जे कोणी गुणग्राही लोक

ज्ञानलालसेनें त्यांजकडे जात त्यांच्याशींच केवळ ते संभाषण करीत. महाराष्ट्राच्या या भागांत लो. टिळक, नानासाहेब देशमुख, केशवराव देशमुख, जोग महाराज, लक्ष्मणराव पांगारकर, इत्यादिकांचा त्यांच्याशीं चांगला परिचय होता. आणि या सर्वांच्या मनांवर श्रीगुलाबराव महाराज यांच्या बुद्धिमत्तेचा व विद्वत्तेचा प्रभाव चांगलाच पडला होता.

यापूर्वी छापलेल्या त्यांच्या एक दोन ग्रंथांवर लिहिण्याचा प्रसंग मला आला; त्या वेळीं मीं जे उद्गार काढले, त्यांतलेच कांहीं येथें पुनः उद्धृत करतों. ह्यावरून माझी त्यांच्याविषयीं असलेली भावना प्रकट होईल.

" श्रीगुलाबराव महाराज यांचा एकेक नवीन ग्रंथ द्वितीय आवृत्तीच्या रूपानें जसजसा प्रसिद्ध होऊन माझ्या पाहण्यांत येत आहे, तसतसें त्यांच्या अलौकिक बुद्धिमत्तेबद्दल माझें कौतुक व माझी आदरबुद्धि हीं अधिकाधिक वाढतच आहेत. त्यांच्या कांहीं ग्रंथांचीं अनेक भाषांत भाषांतरें व्हावयास पाहिजेत, इतकें तें वाङ्मय उत्तम आहे. यांचे कांहीं ग्रंथ जर इंग्रजींत असते, तर त्यांची कीर्ति स्वामी रामतीर्थ किंवा स्वामी विवेकानंद यांच्यासारखी सर्व जगभर पसरली असती. त्यांचे एकंदर ग्रंथ पाहतां तो एक ज्ञानकोशच झालेला आहे. "

" सह्याद्रि " मासिक, जुलै १९३७

( २ )

" ज्ञानमंदिर " मासिक, मुंबई–जून १९३७.

" श्रीगुलाबराव महाराज हे केवळ विभूतिकोटींतले असे सत्पुरुष होते. हें नुकतेच व्यक्तीभूत झालें. पाश्चात्य देशांतील भौतिक सुधारणांच्या मोहक सहवासानें श्रद्धेचा आत्यंतिक लोप होत असलेल्या ह्या आधुनिक काळांतही श्रीगुलाबराव महाराजांचा असामान्य पारमार्थिक अधिकार मोठ्या मी-मी म्हणणाऱ्यांच्या सुद्धां चांगलाच प्रत्ययास येऊन भौतिकाच्या

पलिकडेहि कांहीं उच्च व गूढ शक्ति असल्याविषयींची मान्यता त्यांना द्यावी लागली. अर्थात् अशा आत्मसाक्षात्कारी थोर विभूतीच्या मुखांतून स्रवलेले हे ग्रंथ आहेत एवढें सांगितलें म्हणजे त्यांच्या योग्यतेविषयीं अधिक लिहिण्याचें कारण नाहीं. येवढ्या नऊच व्याख्यानांचा एक ग्रंथ-सुद्धां अध्यात्मसिद्धांतांच्या अधिकारयुक्त विवेचनाच्या संबंधांत लोकमान्य टिळकांच्या 'गीतारहस्या'सहि मागें टाकणारा आहे, असें लोकनायक माधवरावजी अणे यांनीं प्रस्तावनेंत स्पष्ट म्हटलें आहे."

( ४ )

"नवाकाळ"–मुंबई–ता. ३०–७–३७

स्वामी विवेकानंद, स्वामी रामतीर्थ यांच्याप्रमाणें श्रीगुलाबराव महाराज यांच्या वाणीनें व लेखणीनें महाराष्ट्राला मुग्ध केलें होतें. वयाच्या पहिल्याच वर्षी आजारानें त्यांचे डोळे गेले, तरी त्यांनीं हिंदुस्थानांतील व पाश्चात्य देशांतील तत्त्वज्ञानाचा जो निकट परिचय करून घेतला आहे व त्यांच्या ग्रंथांत ठिकठिकाणीं जो दृष्टीस पडतो, त्यावरून त्यांच्या बुद्धिमत्तेचें कौतुक करावेंसें वाटतें. ३४ व्या वर्षी ते इहलोक सोडून गेले. परंतु तेवढ्या अवधींत ऋग्वेद, सायनभाष्य, दयानंदभाष्य, जैमिनी सभाष्य, वात्स्यायन गीत, महाभारत, भागवत, रामायण, योगवासिष्ठ, बृहत्कथा, सर्वदर्शन, बुद्धाचे ग्रंथ, बायबल, कुराण, उपनिषदें, पुराणें, मनुस्मृति, रामतीर्थ, विवेकानंद यांचे ग्रंथ, कालिदास, भवभूति, जगन्नाथपंडित, ज्ञानेश्वरी, एकनाथ, तुकाराम, संत शेखसादी, पोल, डॉयसेन, जाकोबी, उमादा केस, इवेन, थिआसफी, नवें मानसशास्त्र, याप्रमाणें संस्कृत, मराठी, फारशी, इंग्रजींतील ग्रंथ व शास्त्रें त्यांनीं आत्मसात् केलीं होतीं. अध्यात्मशास्त्र आधुनिक शास्त्रीय पद्धतीनें मांडून लोकांना पटवून देण्याची कला श्रीगुलाब-राव महाराज यांना अवगत होती. स्वामी विवेकानंद व स्वामी रामतीर्थ

( ७ )

यांनीं सुशिक्षितांना अध्यात्माकडे नेण्याची जशी कामगिरी केली, तशीच महाराष्ट्रांत गुलाबराव महाराजांनीं केली आहे. त्यांची वाणी अनुभवाची व अधिकारयुक्त आहे. त्यांची बुद्धि सूक्ष्म व खोल होती व आर्यांची आध्यात्मिक अनुभवाची संपत्ति महाराष्ट्राला आधुनिक पद्धतीनें देण्यासाठीं त्यांनीं तिचा उपयोग केला. त्यांच्या लिखाणाचे १८ भाग प्रसिद्ध होऊन पहिली आवृत्ति संपली देखील. अध्यात्मविषयावर हरएक दृष्टीनें प्रकाश पाडणारें ज्ञान या ग्रंथांत सांठवलें आहे.

( ५ )

'केसरी,' पुणें, ता. २७-७-३७

सुमारें २२ वर्षांपूर्वी ब्रह्मीभूत झालेले वऱ्हाड प्रांतांतील जन्मांध सत्पुरुष श्रीगुलाबराव महाराज हे या 'अलौकिक व्याख्यानमाला' ग्रंथाचे जनक होत. त्यांची जन्मसिद्ध विद्वत्ता, साधुत्व व अलौकिक दैवी शक्ति पाहून महाराष्ट्रांतील नामांकित पुरुषांनीं आश्चर्यचकित होऊन महाराजांच्या अलोट ग्रंथसंपत्तीबद्दल परमादर व्यक्त करून ग्रंथगौरव अनेक रीतींनें केलेला आहे.

श्रीगुलाबराव महाराजांची ग्रंथनिर्मिति अफाट आहे. त्यांच्या ग्रंथाचे पूर्वी लहान मोठे १८ भाग छापून प्रसिद्ध झाले होते. त्याशिवाय त्यांचे पूर्णा-पूर्ण असे २५-३० ग्रंथ अजून छापावयाचे राहिले आहेत. पूर्वप्रकाशित १८ भागांची सर्व आवृत्ति दुर्मिळ झाल्यामुळें त्यांच्या शिष्य व भक्तवृंदांनीं श्रीगुलाबरावमहाराजांचे समग्र ग्रंथ प्रकाशन करण्याचें कार्य आरंभिलें असून द्वितीय आवृत्तीपैकीं प्रस्तुत ग्रंथ हा त्या ग्रंथमालेपैकीं ६ वा भाग आहे. जन्मांध संतविभूतीनें लिहिलेली ही व्याख्यानमाला प्रत्येकाला तिच्या नांवा-प्रमाणें खरोखर अलौकिक अजीब वाटेल. जुन्या-नव्या मतांचें त्यांनीं केलेलें विवेचन व भारतीय व पाश्चात्य तत्वज्ञानाचे त्यांनीं केलेले उल्लेख

(८)

पाहिले म्हणजे वऱ्हाडासारख्या मागासलेल्या प्रांतांत जन्म घेऊन, जन्मांध असतांना, कोणत्याही प्रकारच्या लौकिक शिक्षणाचा संपूर्ण अभाव असतांही अवघ्या ३४ वर्षांच्या वयाच्या कालावधींत त्यांनीं केलेल्या अफाट ग्रंथ-निर्मितीबद्दल प्रत्येकास सकौतुक परमादर व पूज्यभाव उत्पन्न झाल्या-शिवाय राहात नाहीं.

या व्याख्यानांत आजतागायत पाश्चात्य तत्त्ववेत्ते, तसेंच अनेक पाश्चात्य दृश्य व अदृश्य शास्त्रें यांचा आत्म्यासंबंधींच्या सर्व मतांचा विचार करून व त्यांच्या विचारसरणींतील दोष व न्यूनता दाखवून आपलीं त्रिकालज्ञ ऋषिमुनिप्रणीत सनातन धर्मतत्त्वें सर्वश्रेष्ठ कशीं आहेत हें आधुनिक सुशिक्षित विद्वज्जनांकरितां श्रीगुलाबरावमहाराजांनीं सोपपत्तिक रीतीनें सिद्ध करून दाखविलें आहे. आमच्यांतील कांहीं आधुनिक सुधारक मंडळींना आर्यसंस्कृतीपेक्षां पाश्चात्य संस्कृतिच श्रेष्ठ वाटावयास लागली, तो त्यांचा भ्रमनिरास करून आर्य संस्कृतीच्याच साह्यानें शाश्वत सुखप्राप्ति कशी करून घेतां येईल हें सुलभ रीतीनें सशास्त्र व सप्रमाण सिद्ध करून देणें हा या अलौकिक व्याख्यानमालेचा मुख्य हेतु आहे.

(६)

'हंस' सातारा–ता. ५–८–३७ ( अग्रलेख )

विदर्भभूमींतील सुप्रसिद्ध संतविभूति श्रीगुलाबराव महाराज यांनीं आधु-निक काळांत आपल्या विद्वत्तेचा आणि वक्तृत्वाचा स्वधर्ममंडनार्थ जितका उपयोग केला, तितका दुसऱ्या कोणींहि केला नसेल. त्यांचें वैदिक धर्माचें ज्ञान केवळ शाब्दिक, बौद्धिक अथवा तार्किक नव्हतें, तर त्यांत स्वानुभ-वाचा, साक्षात्काराचा जिव्हाळा होता. त्यामुळें वैदिक धर्मातील महत्वाच्या सिद्धांतांचें समर्थन त्यांनीं जेवढया निर्भयतेनें, अधिकारानें व आत्मविश्वा-सानें केलें आहे, तेवढें आधुनिक पंडितांपैकीं दुसऱ्या कोणीहि केल्याचें

दिसून येत नाहीं. त्यांनीं आपल्या कुशाग्र बुद्धिमत्तेनें व अलौकिक धारणेनें पाश्चात्यांच्या शास्त्रांचें जसें आकलन केलें, तसेंच त्या शास्त्रांतील चुकांचें व अपूर्णतेचेंहि प्रतिपादन तितक्याच यशस्वी रीतीनें केलें. त्यांच्या ग्रंथांतील प्रतिपादनांत चिकित्सेचें यथार्थ स्वरूप प्रतिबिंबित झालें आहे.

या व्याख्यानमालेच्या जागतिक अपूर्वतेविषयीं लोकनायक अण्यांनीं प्रस्तावनेंत असे उद्गार काढले आहेत कीं, ' आत्मसाक्षात्कार झालेले श्रीगुलाबराव महाराज अध्यात्म सिद्धांतांचें विवेचन ज्या अधिकारानें ' गीतारहस्य'कारांस करतां येणें शक्य नव्हतें. या ग्रंथांतील गंभीर प्रतिपादनाच्या निर्मळ गंगाप्रवाहासमोर विवेकानंद, स्वामी रामतीर्थ यांचीं प्रवचनें पावसाळ्यांतील पहिल्या पुरांत गढूळ पाण्यानें भरून वाहणाऱ्या नद्यांसारखीं वाटतात. "

---

( ७ )

' ज्ञानप्रकाश ' पुणें—ता. २६-११-३७ ( अग्रलेख )

सध्यांचें विसावें शतक हें प्राधान्येंकरून बुद्धिवादाचें युग आहे. या विसाव्या शतकांत श्रुतिवचनापेक्षां शास्त्राला, वेदवाक्यापेक्षां विज्ञानाला, पुराणांपेक्षां प्रचलित सत्यकथांना, विवेकी मनुष्य अधिक महत्त्व देतो. सध्यांचा काळ हा शास्त्रीय सुधारणेचा काल ( Age of Science ) आहे; चमत्कारांचा काळ ( Age of Miracles ) नव्हे. त्यांतही महायुद्धोत्तर काळ हा युद्धपूर्व कालापेक्षां अधिक चिकित्साप्रधान झालेला आहे. या युद्धोत्तर काळांत जुन्या अर्थविषयक, नीतिविषयक, आणि समाजविषयक कल्पनांना जोराचा धक्का बसला असून, एका नव्या वैचारिक क्रान्तीच्या उदयाचीं पूर्वचिन्हें क्षितिजावर चमकूं लागलेलीं आहेत. अशा वेळीं वास्तववाद नि लौकिकवाद यांस भरती यावी यांत नवल नाहीं. कारण सध्यां जगांतील बहुतेक सर्व राष्ट्रांपुढें आर्थिक सुस्थितिसंपा-

दन हाच विषय प्राधान्येंकरून आलेला आहे; व तो समाधानकारक रीतीनें सोडविला जाईपर्यंत धर्मावरील हल्ले चालूच राहतील. अशा या खळबळीच्या काळांत " अलौकिक व्याख्यानमाला " या मथळयाचा एक तीनशें पृष्ठांचा ग्रंथ प्रसिद्ध करणाऱ्या व्यक्तीच्या आत्मविश्वासाचें आणि धर्मनिष्ठेचें कोणीही खात्रीनें कौतुकच करील ! हीं व्याख्यानें म्हणजे श्री गुलाबराव महाराज या जन्मान्ध भक्तश्रेष्ठांच्या मुखांतून बाहेर पडलेली वक्तृत्वगंगा होय. वऱ्हाडांत एका ब्राह्मणेत्तर मराठा कुळांत जन्मलेल्या या जन्मान्ध बालकानें केवळ श्रवणतपोबलाच्या जोरावर अनेक भाषांचें, त्यांतील काव्यांचें आणि तत्त्वज्ञानाचें अध्ययन करून, त्यावर भारदस्त व्याख्यानात्मक जाहीर प्रवचनें करावीत, आणि त्यांत उपनिषदें, स्मृतिपुराणें, एवढींच नव्हेत, तर शंकराचार्य, रामानुजाचार्ज, वल्लभाचार्य, प्लेटो, ॲरिस्टॉटल, कान्ट, स्पेन्सर, शोपेनहार, मिल वगैरे आधुनिक तत्त्वज्ञ आणि तत्त्वज्ञानी यांच्या लौकिक व पारलौकिक सिद्धान्तांची सर्वांगसुंदर आणि मार्मिक चिकित्सा करून श्री. दादासाहेब खापर्डे, श्री. बापूजी अणे, श्री. सरदार माधवरावजी किबे, श्री. राजे औंधकर, ह. भ. प. श्री. लक्ष्मणरावजी पांगारकर, श्री. केशवरावजी देशमुख वगैरे पाश्चात्यज्ञानविभूषित सुशिक्षित विचारवन्तांनाहि कौतुकानें आणि आदरानें डोलावयास लावावें, हा चमत्कार ( Miracle ) अवलोकिला, म्हणजे या वाक्प्रवाहाचें " अलौकिकत्व " कोणालाही प्रतीत झाल्याशिवाय राहात नाहीं.

---

## ( ८ )

### ' उदय ' उमरावती–ता. ७–१२–३७

श्रीगुलाबराव महाराजांची विद्वत्ता, साधुत्व आणि कवित्व हे अलौकिक होते. महाराजांची कवित्वशक्ति अत्यंत शीघ्रप्रसु होती. एखाद्या सहज सुचलेल्या ओवीवर महाराज शेकडोंवारां स्वकृत आव्या रचीत असत. मराठी

भाषेतील ज्ञानेश्वरी, अमृतानुभव वगैरे ग्रंथांतील प्रौढ, रसाळ आणि प्रासादिक काव्यग्रंथांची बरोबरी करणारें काव्य महाराजांनीं निर्माण केलें आहे. महाराजांनीं मराठी भाषेत गद्यात्मक आणि पद्यात्मक असें विपुल वाङ्मय निर्माण केलें. ज्यांच्या ग्रंथांची ग्रंथसंख्या हजारोंनीं, ज्यांचा काव्यसंग्रहहि विपुल! इतकी प्रचंड ग्रंथनिर्मिति अवलोकन केली म्हणजे महाराजांच्या श्रेष्ठत्वाची सहज कल्पना होते व मनाला विस्मय वाटतो. महाराजांच्या ग्रंथकर्तृत्वाच्या प्रचंड संसारावरून शिशुपणींच जन्मांध झालेल्या मूर्तीनीं एवढें ज्ञान कसें संपादिलें असेल असाहि प्रश्न मनासमोर उभा राहतो, आणि महाराजांच्या कर्तृत्वाविषयीं एक प्रकारचें गूढ उत्पन्न होतें, व त्याचबरोबर मनुष्य कितीहि नास्तिक असला तरी अशा विभूतींच्या ठिकाणीं ईश्वरी अंशाची प्रचिती दिसते

प्रस्तुत ग्रंथाला ना० खापर्डे व डॉ. अणे यांनी अत्यंत मार्मिक प्रस्तावना आहे. याशिवाय ह.भ.प. पांगारकरप्रभृति संतवाङ्मयभक्त, ना. दादासाहेब खापर्डे आणि डॉ. बापूजी अणे ह्यांच्या तोंडून श्रीगुलाबराव महाराजांच्या ज्ञानविषयक तल्लखतेच्या, त्यांच्या बहुश्रुततेच्या गोष्टी ऐकावयाला मिळतात, व अर्वाचीन चिकित्सक दृष्टीलाही एक प्रकारचें गूढ पडतें. महाराजांना कोणत्याही भाषेतील धर्मशास्त्रविषयक विचार व त्याचबरोबर पाश्चात्यांतील प्लेटो, साक्रेटीस, डिसकॉर्टेस, कॅन्ट, हेगेल, स्पेन्सर आणि मॅक्समुल्लर यांच्या तत्वज्ञानाचीहि पुरेपूर माहिती होती. जगांतील ज्ञानाची कोणतीहि शाखा महाराजांना अज्ञात नव्हती, ही गोष्ट त्यांनीं निर्माण केलेल्या ग्रंथांतून सहज ध्यानीं येते. ज्ञानदेवांनीं ज्ञानेश्वरीसारख्या अलौकिक ग्रंथाच्या निर्मितीनें तत्कालीन सर्वसाधारण जनसमूहाला ब्रह्मविद्येची माहिती सुगम करून सांगितली. त्यानंतर अध्यात्मविद्येवरील स्वतंत्र रूपानें लिहिलेलें वाङ्मय म्हणजे श्रीगुलाबराव महाराजांचेच ग्रंथ होत.

पौर्वात्य आणि पाश्चात्य तत्त्वज्ञानाचें अत्यंत मार्मिकतेनें तौलनिक या

ग्रंथांत करण्यांत आल्यामुळें प्रस्तुत ग्रंथाला एक ज्ञानकोशाचीच थोरवी प्राप्त झाली आहे. श्रीगुलाबराव महाराजांच्या मराठी वाङ्मयरूपी ज्ञानगंगेंत अवगाहन करून अध्यात्मविद्येचें तत्वज्ञानरूपी शुद्ध उदक प्राशन करण्याचा अवसर सध्यांच्या तरुण पिढीला प्राप्त झाला, याबद्दल कोणालाही आनंद वाटणें साहजिकच आहे. श्रीगुलाबराव महाराजांच्या ग्रंथापासून " दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो । जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥ " ह्या गोष्टीचा मुमुक्षूंना सहज लाभ होण्यासारखा आहे. महाराजांच्या प्रचंड वाङ्मयनिर्मितीपासून व ग्रंथांतील पानापानांतून आढळून येणाऱ्या स्वतंत्र तत्वांच्या विवेचनापासून पाश्चात्यांचेंहि डोळे दिपतील एवढी महाराजांची थोरवी आहे. पण पाश्चात्यांच्या नजरेस महाराजांच्या ग्रंथांतील ज्ञानरवीचें तेज पडेल तो सुदिन !

( ९ )

" महाराष्ट्र " –नागपूर, ता. १९–१२–३७

श्री. गुलाबराव महाराजांचें चरित्र म्हणजे एक मूर्तिमंत चमत्कार आहे; व त्यांतील एक एक घटना लक्षांत घेतली असतां " शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते " या भगवदुक्तीची सत्यता मनाला पटल्याशिवाय राहत नाहीं. जन्म पहावा तर तो शूद्रकुळांत झालेला; जन्मल्यापासून नवव्या महिन्यांतच दृष्टि जाऊन अंधत्व आलेलें; व या अंधत्वामुळें लौकिक शिक्षणसंस्कारालाहि महाराज पारखे झालेले. पण, प्रस्तुत ग्रंथावलींत महाराजांचें जें पांडित्य, जो बहुश्रुतपणा आणि जी आत्मानुभूति प्रकट झाली आहे, ती पाहिली असतां मन आश्चर्यानें गुंग होऊन जातें. उमेचें वर्णन करितांना कविकुलगुरूनें म्हटलेलेंच नाहीं काय, कीं तिची शैशवावस्था संपतांच प्राक्तनविद्येचें स्मरण तिला आपोआपच होऊन ती प्रगल्भ आणि पूर्णप्रज्ञ झाली म्हणून ! एरवीं त्यांच्या बुद्धिमत्तेचीच केवळ नव्हे,

तर ब्रह्मवेत्तेपणाचीहि उपपत्ति कशी लागणार ? हा एक चमत्कार झाला. दुसरा चमत्कार असा कीं, महाराजांचें भारतीय तत्वज्ञानाचें ज्ञान जसें सांगोपांग होतें, तसेंच त्यांचें पाश्चात्य तत्वज्ञानाचेंहि ज्ञान वाखाणण्याजोगें होतें. गुलाबराव महाराजांची दृष्टि नाहींशी झाल्यावर त्यांच्या सर्व शरीरालाच जणुं डोळे फुटले; व दृष्टीचीं कामें श्रुति, स्मृति आणि मति यांनीं अहमहमिकेनें करून त्यांच्या त्या वैगुण्याचा बचपा सहस्रपटीनें भरून काढला. कारण त्यामुळें त्यांचें मन कमालीचें अंतर्मुख आणि चिंतनप्रवण होऊन अज्ञेयाच्या साक्षात्काराचे आनंदोद्गार हजारों कारंज्यांच्या फवाऱ्यांसारखे त्यांच्या मुखांतून अहर्निश बाहेर पडले.

प्रस्तुत ग्रंथावलि म्हणजे त्या आनंदोद्गारांचें, त्या समयस्फूर्त सूक्तांचें भांडारच होय. त्याचें समालोचन करण्याचा आमचा अधिकार नाहीं. आम्ही फक्त त्याचें स्तवनच फार तर करूं शकतों. गुलाबराव महाराजांच्या वाङ्मयोदधींत आलोडन केल्यावर, त्यांच्याविषयीं फक्त आश्चर्याची भावना तेवढीच व्यक्त करून, विनम्र मस्तकानें महाराजांच्या चरणांसमोर आम्ही लेखणी खालीं ठेवतों. जगांत कांहीं आश्चर्यें अशीं आहेत कीं, मानवी बुद्धीला त्यांच्यापुढें कोटांगण घालणेंच प्राप्त आहे. श्रीगुलाबराव महाराज आणि त्यांची समग्र ग्रंथावलि हें या विसाव्या शतकांतील एक अशा कोटींतीलच आश्चर्य आहे !

---

( १० )

## THE MAHRATHA, POONA

Shri Gulabrao Maharaj was the saint philosopher of Berar. He was born in the year 1881 and passed away in 1915. Though he was struck blind in his very childhood, he by his

genius became one of the greatest philosophers of the time. He was born in a wealthy family. From the very childhood he cultivated and trained his mind for meditation. Indian philosophy was his chosen subject and with the help of a reader he studied almost all the masterpieces of the master sages. Vedas, Upanishads and such other Hindu religious works he learnt by heart. But only with that study his heart did not rest content. He therefore studied Kant, Spencer, Darwin and others and completed his study of the Western Philosophy.

Like the Greek philosopher Socrates Shri Gulabrao Maharaj used to discuss many and varied important problems such as sociology, philosophy, religion, culture with those who happened to come into his contact. Learned pandits and research scholars, European professors and Indian Shastris, many had a good fortune to hear long and sweet sermons from the lips of Shri Gulabrao Maharaj. His exposition of a particular point, was masterly and convincing, and contributed to new thought. His love transcended all human limits. What he thought, he spoke; and what he spoke, he acted. Shri Gulabrao Maharaj, by his personal loving behaviour, set an example to all those who were seekers after truth. His books so far published are replete with his philosophical ideas and richly deserve to be translated into English. It will be a great contribution to world thought. In his life-time he published some of his works which dealt with present day life topics. After his death his disciples spontaneously continued the publication of his remaining manuscripts. The 1 st edition of the 18 volumes was already out of print within short period and hence his admirers have undertaken the publication of their 2nd edition. The writings of Shri Gulabrao Maharaj contain such rich mine of subjects that it can rightly be called an 'Encyclopaedia' of knowledge.

॥ श्रीज्ञानेश्वरमाउली समर्थ ॥

श्रीमद्गुरु गुलाबराव महाराजकृत समग्र ग्रंथावलीचे

## आश्रयदाते व साहाय्यक

ग्रंथप्रकाशनास शंभर रुपये देणारे आश्रयदाते:—

| | | | मिळालेली रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| १ | श्रीमंत युवराजमहाराज, संस्थान भोर (पहिला हप्ता शंभर रुपये) | | १०० |
| २ | श्री० महादेव अंबादास उमरावतीकर डि. सेशन जज्ज, नागपूर. | | १०० |
| ३ | ,, काशीनाथ जनार्दन आठवले, अॅ. डि. सेशन जज्ज, जबलपूर | | १०० |
| ४ | ,, नारायण यशवंत वाघळे, जहागीरदार, इंदूर | ... | १०० |
| ५ | ,, नानासाहेब जोशी, मालगुजार, भिवापूर | ... | १०० |
| ६ | ,, नानासाहेब फाटे, मालगुजार, नागपूर | ... | १०० |
| ७ | ,, लक्ष्मण श्रीधर देशमुख, नागपूर | ... ... | १०० |
| ८ | ,, माधव पांडुरंग पांचपोर, नागपूर | ... ... | १०० |
| ९ | ,, पांडुरंग रामचंद्र पांडे, कुही | ... ... | १०० |
| १० | ,, नरहर राजाराम देशपांडे, मुलताई | ... | १०० |
| ११ | ,, नारायण रघुनाथ फेकर, वकील, हरदा. | ... | १०० |
| १२ | ,, वामन जोगेश्वर दशसहस्र, तहशीलदार, अमरवाडा | | १०० |
| १३ | ,, शेटजी रामकिसन अंबादास मारवाडी, यावली ... | | १०० |
| १४ | ,, मुरारी हरी झोडगांवकर, सब डिस्ट्रि. ऑफिसर, उमरावती | | १०० |
| १५ | ,, हरि गोपाळ आठवले, पेन्शनर पुणें. | ... | १०० |
| १६ | ,, ज्ञानेश्वर उद्धव मांढरे, पुणें. | ... ... | १०० |
| १७ | ,, दिनकर वामन गोखले, वकील खांडवा | ... | ५० |
| १८ | ,, नारायणराव वाडेगांवकर, डि. व सेशन जज्ज, नागपूर • | | २५ |
| १९ | ,, विष्णु बापूजी घामापूरकर, प्रोफेसर शेतकी कॉलेज, नागपूर | | २० |
| २० | ,, रघुनाथराव मगारे, डिस्ट्रिक्ट व सेशन जज्ज, नागपूर | | २० |
| २१ | ,, भय्यासाहेब तांबे तहशीलदार, नागपूर | ... | २० |
| २२ | ,, भगवंत रामचंद्र देव, वकील बडोदे. | ... | २० |

| पन्नास रुपये देणारे साहाय्यक | | पैकीं मिळाले |
|---|---|---|
| १ श्री० रणछोडदास नाराणदास, सॉलिसिटर, मुंबई | ... | ५० |
| २ ,, स. का. करमरकर, बॉम्बे प्रा. को. बँक, मुंबई | ... | ५० |
| ३ ,, ग. वि. साळवेकर, मालक सरदारगृह, मुंबई | ... | ५० |
| ४ ,, मा. ब. रेटरेकर, स्टेट इंजिनिअर, ग्वालेर | ... | ५० |
| ५ ,, शि. रा. गोखले, इलेक्ट्रिकल इंजिनिअर, इगतपुरी | | ५० |
| ६ ,, ग. स. मराठे, अक्चुअरी, पुणें ... | ... | ५० |
| ७ ,, वि. ना. वर्तक चीफ इंजिनिअर P. W. D. पुणें, | | ४० |
| ८ ,, द. भ. माचवे, हेडक्लार्क B. L. Ry. कुर्डुवाडी | | ४० |
| ९ ,, ना. श्री. राजहंस बालगंधर्व, पुणें | ... | ४० |
| १० ,, सरदार ख. रा. विंचूरकर, पुणें ... | ... | ३० |
| ११ ,, नटेश आय्यर, सुपरिंटेंडिंग इंजिनिअर P. W. D. | | २५ |
| १२ ,, रावबहादूर गं. बा. काळे, इंजिनिअर P. W. D. पुणें | | २५ |
| १३ ,, शं. शि. क्षीरसागर ( M. A. Deptt. ) पुणें | ... | २५ |
| १४ ,, गो. ना. मिरगळ ( M. A. Deptt. ) पुणें | ... | २५ |
| १५ ,, बा. भा. जोशी, मालक ज्ञानविलास प्रेस, पुणें | ... | २५ |
| १६ ,, मास्टर कृष्णराव फुलंब्रीकर, पुणें ... | ... | १५ |
| १७ ,, वे. शा. सं. इ. बा. केवले, नागपूर ... | ... | १५ |
| १८ ,, का. म. महाजन, वकील, पुणें | | १० |
| १९ ,, स. आ. कोठेकर M. A. हेडमास्तर, वाशीम | | |

**टीपः**—( १ ) श्रीमंत सरकार राजेमहाराज बाळासाहेब पंडित प्रतिनिधि, B. A. संस्थान औंध, ( २ ) श्रीमंत सरकार माधवरावसाहेब किबे M. A. Ph. D. इंदूर ( ३ ) सुप्रसिद्ध दानशूर श्रीमंत प्रतापशेट, अमळनेर. ( ४ ) डॉ. रामकृष्ण हरि भडकमकर M. A. M. D. पुणें यांनीं मोठ्या उदार देणगीचीं जीं आश्वासनें दिलीं आहेत त्यांचा उल्लेख मागील ग्रंथांत केलाच आहे.

( २ ) वरील यादी जून १९३८ अखेरपर्यंतची आहे. पुढील आश्रयदाते व साहाय्यक यांच्याकडून जशी रोख रक्कम मिळत जाईल तशीं पुढील ग्रंथांत त्यांचीं नांवें प्रसिद्ध केलीं जातील.

प्रकाशक